# अदृश्य माणूस

[ एच्. जी. वेल्सकृत The Invisible Man ]

अनुवादक

भा. रा. भागवत, बी. ए.

किंमत १॥ रुपया

लाखाणी बुक डेपो, मुंबई ४

# एच्. जी. वेल्स

अगदीं अलीकडच्या इंग्रजी लेखकांत जे अग्रगण्य होऊन गेले, त्यांत एच्. जी. वेल्स यांची गणना होते. एक थोर विचारवंत, समाजशास्त्रज्ञ, इतिहासकार, कथालेखक व कादंबरीकार अशा भूमिका त्यांनीं आपल्या साहित्यांतून पार पाडल्या. त्यांच्या इतकें विविध आणि विपुल वाङ्मय फारच थोड्या लेखकांनीं लिहिलें असेल.

हर्बर्ट जॉर्ज वेल्स यांचा जन्म लंडनच्या एका उपनगरांत अगदीं गरिबींत झाला. त्यांच्या वडिलांचें चिनीमातीच्या जिनसांचें दुकान होतें. तें रुटुखुटु चाले आणि त्यांत वडिलांचें दुकानाकडे मुळींच लक्ष नसे. त्यांना क्रिकेटचा दांडगा शौक आणि क्रिकेटच्या शिकवण्यांवर ते आणखी थोडे पैसे मिळवीत. आई कर्तबगार. तिनें पूर्वी मोलकरणीचीं कामें केलेलीं. दुकान जवळ जवळ तीच चालवी. पुढें शिडीवरून पडून वडिलांचा पाय मोडला; क्रिकेटला सलाम ठोकून त्यांना दुकानांतच राहावें लागलें. आणि नाइलाज म्हणून आईनें पुन्हा मोलमजुरी पत्करली. हर्बर्टला तिनें वयाच्या तेराव्या वर्षीच एका फॅन्सी कपड्यांच्या दुकानांत कामाला ठेवलें. सकाळीं साडेसात ते रात्रीं साडेआठपर्यंत तो दुकानांत राबे. 'हुद्दा' कॅशियरचा; पण दुकान झाडणें, खिडक्या पुसणें हीं कामें त्यालाच करावीं लागत. गणितांत डोकें तरबेज; पण कामांत लक्ष नाहीं; चोरून पुस्तकें वाचण्याचा नाद. यामुळें हिशेबांत घोटाळे होत होत शेवटीं नोकरीवरून उचलबांगडी झाली. पुढें अशाच प्रकारचीं दुकान-नोकराचीं कामें करतां करतां अखेरीस मिडहर्स्टच्या एका शाळेंत त्याला दुय्यम शिक्षकाची नोकरी मिळाली आणि तेव्हांपासून त्याला बरे दिवस आले. वाचायला भरपूर मिळालें; भराभर परीक्षा

उत्तीर्ण झाल्या; हक्स्लेसारख्या नामवंत शास्त्रज्ञाच्या हाताखालीं विज्ञानाचें शिक्षण मिळालें आणि अशा रीतीनें इंग्रजी भाषेला भूषणभूत अशा एका जाड्या विद्वान् साहित्यिकाचा पिंड तयार झाला. बाळपणापासून झालेले संस्कार त्यांत पूर्णपणें उमटले होते. श्रमजीवी वर्गाबद्दल आत्यंतिक सहानुभूति वेल्सच्या लिखाणांत आढळते. पुढें साहित्यांत संपत्ति व यश भरपूर मिळूनही वेल्स वरच्या वर्गाशीं कधीं समरस होऊं शकला नाहीं. लोकशाही समाजवादाकडेच त्याचा ओढा होता.

वेल्सनें पहिलें आणि सर्वप्रमुख लेखन केलें तें अद्‌भुत शास्त्रीय कादंबऱ्यांचें. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस ज्यूल व्हर्ननें जी कीर्ति मिळवली, ती वेल्सनें विसाव्या शतकाच्या प्रारंभीं मिळवली. दोघांचीही कल्पकता दांडगी, दूरदृष्टि थक्क करून सोडणारी; पण दोघांमध्यें एक मोठा फरक होता. व्हर्नची दृष्टि कांटेकोर आणि हिशेबी. वेल्सच्या कादंबऱ्यांची मूस विज्ञानाची असली तरी यंत्रांपेक्षां तो माणसांकडे जास्त लक्ष देई. मनुष्यस्वभावांतले बारकावे वेल्सनें जसे रंगवले तसे व्हर्न कधीं रंगवूं शकला नसता—तसा त्यानें प्रयत्नही केला नसता. यंत्राचीं वर्णनें करण्यांत ज्यूल व्हर्नचीं शेंकडों पानें खर्ची पडत; तर एक दोन पानांतच आपल्या पात्रांच्या स्वभावांचे पापुद्रे वेल्स उकलून दाखवी. ‘ चंद्रावर स्वारी ’ या अद्‌भुत विषयावर दोघांनींही कादंबऱ्या लिहिल्या; त्या वाचल्या तरी हें लक्षांत येतें. या स्वारीसाठीं ९०० फूट लांबीची प्रचंड तोफ ओतण्याचा उपद्व्याप व्हर्ननें केला आणि अर्धं पुस्तक या तयारीच्या वर्णनानें भरलें. वेल्स या फंदांतच पडला नाहीं. चंद्रावर जाण्याचें साधन त्याच्या दृष्टीनें दुय्यम होतें. चंद्रावरचें अद्‌भुतरम्य वातावरण आणि त्या नव्या वातावरणांत मनुष्यप्राणी गेल्यावर त्याची वागणूक हीं त्याच्या दृष्टीनें महत्त्वाचीं होतीं. म्हणून त्याच्या कॅव्हर नांवाच्या नायकानें ( ‘ फर्स्ट मेन इन् दि मून ’ ) एक धातूच अशी शोधून काढली कीं जिला गुरुत्वाकर्षणशक्ति छेदून जाऊं शकत नाहीं ! ( जसा लाकडाला प्रकाश छेदूं शकत नाहीं. ) हा पदार्थ मिळाल्याबरोबर कॅव्हरसाहेब चंद्रावर जायला निघाले.

विज्ञानाकडे आशेनें पहाणाऱ्या कादंबऱ्या वेल्सनें लिहिल्या. 'दि वर्ल्ड सेट फ्री' ही त्याची कादंबरी तर अणुशक्ति माणसावर कशी उपकार करूं शकेल त्याचीं चित्रें उभीं करते. पण पुढें पुढें वेल्सलाही निराशा-वादानें ग्रासलें. युद्धाचा शास्त्रीय भयंकरपणा त्याला भेडसावूं लागला. यंत्राच्या आहारीं जाऊन मनुष्यप्राणी स्वतःचा नाश करून घेईल कीं काय अशी भीति त्याला वाटूं लागली. त्याचा 'अदृश्य माणूस' चमत्कारिक शोध लावतो आणि माथें भडकून सर्व संहार करायला निघतो. जगाचें वाटोळें करण्यांत त्याला यश मिळत नाहीं. पण सत्यसृष्टींत अशी अशा बाळगावी का ? मानवजातीचे शोध आपल्याला प्रलयाकडे तर नेत नाहींत ना, या शंकेनें त्याला व्याकुळ केलें.

पृथ्वीच्या संहाराचें चित्रही त्यानें कथानकांतून रंगवलें; आणि इति-हासावरून तरी माणसानें बोध घ्यावा व पुन्हा रानटी अवस्थेकडे जाऊं नये अशा हेतूनें नव्या दृष्टिकोणांतून त्यानें दोन ग्रंथ लिहिले. एक 'आऊटलाइन हिस्टरी ऑफ दि वर्ल्ड' आणि दुसरें 'वर्क, वेल्थ अँड हॅपिनेस ऑफ दि मनकाइण्ड.'

'दि इन्व्हिजिबल् मॅन' ही वेल्सची कादंबरी त्याच्या इतर शास्त्रीय कथांपेक्षां थोडी वेगळी आहे. या ठिकाणीं चमत्काराच्या शोधासाठीं मनुष्याला कुठें दूर जावें लागत नाहीं. मनुष्यांतच चमत्कार प्रवेश करतो ! नेहमींच्या चिरपरिचित, निरुपद्रवी वस्तु—बिछाना, खुर्ची, सदरा, सायकल, पुस्तकें—विचित्र तऱ्हेनें वागतात आणि एका खेडे-गांवांतल्या संथ जीवनांत खळबळ निर्माण करतात. भुताटकीच्या लोक-कथांवर केलेला हा शास्त्रीय संस्कारच आहे म्हणा ना ! पण या चमत्कारिक घडामोडींचें वर्णन करतांना वेल्सचे पाय त्याच्या आवडत्या आंग्लभूमीवर पक्के रोवलेले आहेत; इंग्लंडमधल्या आडवळणी खेड्यांतली राहणी त्यानें हुबेहूब रंगवली आहे.

'इन्व्हिजिबल् मॅन'वर युनिव्हर्सल कंपनीनें चित्रपट काढला, तोहि तंत्र व कला या दोन्ही बाबतींत उत्कृष्ट ठरला. फक्त कथानक जास्त

नाट्यपूर्ण करण्यासाठीं केंपचा मोटारीसह कडेलोट, आगगाडीचा भीषण अपघात असल्या जादा प्रसंगांची दिग्दर्शकानें त्यांत भर घातली होती. पण 'अदृश्य माणसा'च्या—म्हणजे त्याच्या कपड्यांच्या—विचित्र हालचाली जशा त्यांत ट्रिक फोटोग्राफीचा चातुर्यानें उपयोग करून दाखवल्या होत्या, त्याप्रमाणेंच अदृश्य माणसाची अत्यंत कठीण भूमिका क्लॉड रेन्स नांवाच्या नवागत नटानें कौशल्यानें पार पाडली होती. अदृश्य स्थितींत पडद्यावर प्रवेश करणाऱ्या या नटानें पुढें चित्रपटसृष्टींत अव्वल दर्जाचें स्थान पटकावलें.

एच्. जी. वेल्स १३ ऑगस्ट १९४६ रोजीं वयाच्या ८० व्या वर्षी निधन पावले. त्यांच्या 'इन्व्हिजिब्ल् मॅन'चा मराठी अनुवाद करण्याचे अधिकार त्यांच्या वारसदारांच्या वतीनें मला दिल्याबद्दल लंडन येथील ए. पी. वॉट अँड सन या प्रकाशन संस्थेचा मी आभारी आहें. हा अनुवाद प्रथम **बालमित्र** मासिकांतून क्रमशः प्रसिद्ध झाला; तो आत पुस्तकरूपानें निघत आहे.

—भा. रा. भागवत




## १ हा कोण विचित्र पाहुणा ?

फेब्रुवारी महिन्यांतला एक दिवस. कडाक्याची थंडी पडली होती. झोंबणारा वारा वहात होता. बर्फाचे झोत सुटले होते. अशा हवेंत ब्रँबलहर्स्ट स्टेशनवरून एक विचित्र वाटसरू चालत चालत ऐपिंग गांवांत आला आणि मिसेस् हॉलच्या पथिकाश्रमांत त्यानें अडखळत पाऊल टाकलें.

प्रवाशाच्या हातांत एक लहान काळी बॅग होती. आंग डोक्या-पासून पायांपर्यंत कपड्यांनीं झाकलेलें होतें. हातांत जाड हातमोजे होते आणि डोकीला मऊ फेल्ट हॅट होती. हॅटचा रुंद पट्टा त्यानें इतका पुढें ओढून घेतलेला होता कीं नाकाच्या चकचकीत बोंडी-खेरीज त्याच्या चेहऱ्याचा तसूभरसुद्धा भाग दिसणें शक्य नव्हतें. त्याच्या खांद्यावर आणि अंगावर बर्फाचीं पुटें बसलीं होतीं आणि

हातांतल्या बॅगच्या ओझ्यांतही बर्फाच्या जाड झालरीनें भर टाकली होती. जवळजवळ अर्धमेल्या स्थितींतच तो पथिकाश्रमांत शिरला आणि शिरतां क्षणीं त्यानें आपली बॅग फेकून देऊन गर्जना केली, "शेगडी कुठें आहे?—मेहरबानी करा नि एक शेगडी द्या! एक खोली द्या—"

बोलतां बोलतां त्यानें ओसरींत पाय आपटले; कपड्यांवरचें बर्फ झटकलें, मिसेस् हॉलच्या अंगावर दोन गिनी भिरकावल्या आणि पथिकाश्रमांत ठाण मांडलें.

बाईंनीं माजघरांतली शेगडी पेटवली आणि पाहुण्यांना तिथेंच सोडून त्या स्वतः स्वयंपाकाचें पहायला गेल्या. ऐपिंगसारख्या खेड्यांत हिंवाळ्यासारख्या ऋतूंत पाहुणा येणें म्हणजे महद्भाग्याची गोष्ट होती. त्यांतून असा पाहुणा तर अलभ्यच. दराची चौकशी नाहीं कीं कसलीही घासाघीस नाहीं!

मांसाचा टोस्ट चांगला भाजून झाला, मिलीला शेलक्या शिव्या देऊन झाल्या—मिली ही बाईंनीं हाताखालीं कामाला ठेवलेली पोरगी—बशा, प्याले, चमचे, कांटे घेऊन बाई लगबगीनें पुन्हा बाहेर आल्या आणि मेजावर स्वच्छ चादर पसरून त्यांनीं पाहुण्यांच्या न्याहारीची तयारी केली. हें चालू असतांना त्यांनीं सहज पाहुण्यांकडे पाहिलें.

शेगडी चांगली धगधगून पेटली होती, तरी पाहुण्यानें आपला जामानिमा उतरला नव्हता. बाईंकडे पाठ करून तो खिडकीशीं उभा होता आणि तावदानांतून बाहेर चाललेल्या हिमवृष्टीकडे टक लावून पहात होता. मोजे घातलेले आपले हात त्यानें पाठीशीं एकांत एक अडकवले होते आणि कसल्या तरी विचारांत तो अगदीं गढून गेला होता. बाईंनीं पाहिलें तों पाहुण्यांच्या आंगरख्यावर

अजूनही कांहीं बर्फाचे ठिपके होते आणि ते घसरून खालीं जाजमावर ओघळत होते.

"आपली हॅट न् कोट काढून घेऊं का साहेब? सैंपाकघरांत आत्तां झटदिशीं वाळवतां येतील."

"नको!" पाहुण्यानें पाठही न वळवतां उत्तर दिलें.

त्यानें आपला प्रश्न ऐकला तरी कीं नाहीं अशी बाईंना शंका आली आणि त्या पुन्हा विचारणार होत्या. पण तेवढ्यांत पाहुण्यानें नुसती मान वळवून मागें पाहिल्यासारखें केलें आणि म्हटलें, "मला पोशाख उतरायची इच्छा नाहीं."

बाई थोड्या चमकल्या.

त्याच्या डोळ्यांवर निळ्या भिंगांचा जाड चष्मा होता. चष्म्याच्या दोन्हीं बाजूंना निळ्याच कांचेचीं ढापणें होतीं. कोटाची कॉलर त्यानें ताठ उभी केलेली होती, गालांवर झुपकेदार कल्ले होते आणि त्यामुळें त्याचा चेहरा संपूर्ण झाकला गेला होता.

"आपली इच्छा साहेब!" बाई ठसक्यांत म्हणाल्या. "खोली तापायला आतां वेळ लागायचा नाहीं म्हणून म्हटलं."

यावर पाहुण्यानें उत्तर न देतां पुन्हा मान फिरवली.

आणखी बोलणें काढण्याची ही वेळ नव्हे हें बाईंनीं ओळखलें. मेजावर त्यांनीं आणलेले पदार्थ त्वरेनें मांडले आणि त्या द्रुतगतीनें खोलींतून निघून गेल्या.

त्या परत आल्या तेव्हांही पाहुणा तसाच दगडी पुतळ्याप्रमाणें उभा होता. पाठीला किंचित् पोक आलेलें, कॉलर ताठ, हॅटचा टिपकणारा पट्टा खूप पुढें ओढलेला, तोंड अन् कान अगदीं पूर्ण-पणें झाकलेलीं.

बाईंनीं अंडीं आणि मांसाचा टोस्ट जरा ठणदिशींच मेजावर

ठेवला आणि पुकारलें,

" आपली न्याहारी तयार आहे, साहेब. "

" थँक्स. "

पण बाईंनीं पुन्हा जातांना दरवाजा लोटला तोंपर्यंत पाहुणा जागचा हलला नव्हता. मग झटक्यांत मागें वळून तो जरा उतावीळपणानेंच मेजापाशीं आला.

सैंपाकघरांत मिलीचें अद्यापि मोहरी फेसणें चाललें होतें. तिच्या हातांतून वाडगा–चमचा हिसकावून घेऊन बाईंनीं पुन्हा एकदा तिचा चेंगटपणाबद्दल उद्धार केला आणि स्वतःच तें काम पुरें केलें. नंतर एका काळ्याभोर सोनेरी तबकांत वाडगाभर मोहरीचें कालवण ऐटबाजपणें मांडून बाईनीं तें माजघरांत नेलें.

दारावर त्यांनीं थाप मारली होती. ती थाप ऐकून पाहुण्यानें इतक्या त्वरेनें हालचाल केली कीं हॉलबाईंना फक्त एक पांढुरकी आकृति मेजाखालीं दिसेनाशी होत आहे असें दिसलें. बहुधा खालीं पडलेला कांहीं जिन्नस पाहुणा उचलीत असावा. बाईंनीं वाडगा मेजावर आपटला. त्याच वेळीं त्यांच्या लक्षांत आलें कीं पाहुण्यानें आपली हॅट व आंगरखा काढून शेगडीपुढें एका खुर्चीवर टाकला होता—आणि हें काय? त्यानें आपले ओले बूट शेगडीच्या अगदीं कांठांना चिकटून कां म्हणून ठेवावेत? शेगडीला गंज चढला म्हणजे?

बाईंचा निर्धार झाला. बुटांजवळ जात त्या म्हणाल्या, " आतां हें नेलं तर चालेल ना—वाळवायला? "

" त्या हॅटला हात लावूं नका " पाहुणा ओरडला. त्याचा आवाज घुसमटल्यासारखा येत होता.

मिसेस हॉलनीं वळून बघितलें. पाहुण्यानें डोकें वर केलें आहे,

आणि तो आपल्याकडेच बघतो आहे असें त्यांना दिसलें.

क्षणमात्र बाईनीं स्तिमित नजरेनें त्याच्याकडे पाहिलें. त्यांच्या तोंडून शब्दही निघेना, एवढ्या त्या चकित झाल्या होत्या.

पाहुण्यानें तोंडाजवळ एक पांढरा रेशमी रुमाल धरला होता आणि त्यामुळें त्याचें तोंड अजिबात झाकलें गेलें होतें. त्याचा आवाजही त्यामुळेंच घुसमटल्यासारखा आला असावा. पण मिसेस् हॉल दचकल्या त्या केवळ तेवढ्यामुळें नव्हे. निळ्या चष्म्याच्या वरच्या अंगाला पाहुण्याचें सबंध कपाळ एका पांढऱ्या पट्टीनें बांधल्यासारखें दिसत होतें. तशाच आणखी एका पट्टीनें त्याचे कान बांधलेले होते. मिळून त्याच्या त्या टोकदार गुलाबी नाकाखेरीज चेहऱ्याचा अणुभरही भाग उघडा दिसत नव्हता! तें नाक मात्र अजूनही पहिल्याइतकेंच चकचकीत दिसत होतें. आडव्या तिडव्या बँडेजच्या पट्ट्यांमुळें त्याचें रूप आणखीच भेसूर वाटत होतें.

त्यानें तोंडावरचा रुमाल काढला नाहीं. तसाच घट्ट धरून ठेवला. आणि त्याच्या आडून अस्फुट आवाजांत पुन्हा बजावलें, "हॅटला हात लावूं नका."

बाईंना बसलेला आश्चर्याचा धक्का ओसरत चालला होता. त्यांनीं हॅट परत खुर्चीवर, होती तशी ठेवली आणि त्या पुटपुटल्या, "म–मला माहीत नव्हतं—साहेब—" गोंधळल्यासारख्या होऊन त्या मध्येंच थांबल्या.

"थँक् यू!" पाहुण्यानें रुक्ष सुरांत म्हटलें. त्यानें पटकन् दरवाजाकडे पाहिलें आणि पुन्हा पटकन् मिसेस हॉलकडे पाहिलें.

"मी आत्तां आणत्यें ते सुकवून!" बाई म्हणाल्या आणि कपडे घेऊन खोलीबाहेर गेल्या. दार लावण्यापूर्वीं पुन्हा एकदा तें चिरगुटांनीं गुंडाळलेलें मुंडकें आणि तो निळा चष्मा त्यांनीं पाहून

घेतला. दार ओढून घेतल्यावर बाई क्षणभर तिथेंच उभ्या राहिल्या. त्यांचें आंग थरथर कांपत होतें. चेहऱ्यावर विलक्षण आश्चर्य नि कुतूहल दिसत होतें.

"बाई—बाई—बाई!" त्या आपल्याशींच उद्गारल्या.

त्या निघून गेल्यावर त्यांच्या पावलांचा आवाज ऐकत पाहुणा कांहीं वेळ तसाच बसून राहिला. मग त्यानें आधीं खिडकींतून बाहेर पाहिलें आणि नंतर पुन्हा न्याहारीला सुरवात केली.

एकच घास त्यानें खाल्ला असेल. तो परत उठला, खिडकी-जवळ गेला. खालच्या तावदानांवर पडदा ओढलेला होता; पण वरच्या तावदानांतून सर्व दिसत होतें.

विचित्र पाहुण्यानें वरचाही पडदा सरकवून घेतला, तेव्हांच त्याचें समाधान झालें.

तिकडे मिसेस् हॉल सैंपाकघरांत पाहुण्यांचे कपडे सुकवण्या-करतां शेगडींत कोळसे टाकीत होत्या. त्या स्वतःशींच पुटपुटल्या, 'बिचारा!—कुठच्या तरी अपघातांत सांपडलाय् म्हणा, किंवा कसलं तरी त्याचं ऑपरेशन झालंय् म्हणा. पण काय भयंकर दिसतो त्या बँडेजांत! अन् ते गॉगल तरी काय बाई! आणि तोंड—तोंडही कापलं बिपलं आहे कीं काय त्याचं? सारखा रुमाल तोंडावर धरून काय बोलतो....'

खरकटीं भांडीं न्यायला त्या पुन्हा माजघरांत गेल्या तेव्हां तो पाइप ओढीत होता. तोंडावर रुमाल मात्र अजूनही दाबून धरलेला होताच. त्यावरून त्याच्या तोंडालाही जखम झालेली असावी या तर्काला बळकटी आली.

"स्टेशनवर माझं थोडं सामान राह्यलंय्. तें आणण्याची व्यवस्था होईल?" त्यानें विचारलें.

"उद्यां—"

"उद्यां!" तो एकदम म्हणाला. "आत्तां नाहीं जमणार? एखादी घोडागाडी—"

कांहीं तरी बोलायला मिळतें आहे याचेंच समाधान मानून मिसेस् हॉल म्हणाल्या, "रस्ता फार खराब आहे, साहेब. गेल्याच वर्षी एक अपघात झाला होता. गाडीवाला नि गिऱ्हाईक दोघेही जागच्या जागीं ठार झाले. केव्हां, कुणाला अपघात होईल याचा नेम का असतो, साहेब?"

पण बाईंची युक्ति सफळ झाली नाहीं. पाहुणा एकदम म्हणतो, "पाइप विझलाय् माझा. तुमच्याजवळ काड्यापेटी आहे का?"

पाहुण्याच्या तोडून बोलण्यानें बाईंना राग आला. पण दोन गिनींचें स्मरण ठेवून त्यांनीं निमूटपणें तिथून प्रयाण केलें आणि 'वड्याचें तेल वांग्यावर' या नात्यानें मिलीची त्यांनीं खरपूस हजिरी घेतली.

दिवसभर पाहुण्यानें स्वतःला माजघरांत कोंडून घेतलें होतें. काळोख पडूं लागला तशा, त्यानें खोलींत पांच एक मिनिटें येरझारा घातल्या असतील. कान देऊन एखाद्यानें ऐकलें असतें तर पाहुणा शेगडींत कोळसे टाकतो आहे असा त्यानें तर्क केला असता. त्याची स्वगत बडबडही मधून मधून चालली होती. मग पुन्हा आरामखुर्ची करकरली. त्यावरून स्वारीनें बहुधा पुन्हा बैठक मारली असावी.

त्यानंतर संध्याकाळीं गांवांतला घड्याळजी टेडी हेन्फ्रे पथिकाश्रमांतलें घड्याळ दुरुस्त करण्यासाठीं येऊन गेला. तो बाहेर पडला तेव्हां त्याची मुद्रा चमत्कारिक दिसत होती आणि तो स्वतःशीं बडबड करीत होता.

'च्यॅः!' तो रस्त्यांत स्वतःशींच पुटपुटत चालला. 'एवढा चिडतोस कां पण, लेका? तुझ्याकडे पहायचं देखील नाहीं कीं काय? माहीत आहे मोठा मदनाचा पुतळा लागून गेला आहेस तो! का पोलीस बिलीस मागावर आहेत म्हणून गुंडाळलं आहेस स्वतःला?'

वाटेंतच त्याला हॉल भेटला. हॉल म्हणजे अर्थात् मिसेस् हॉलचा नवरा. अलीकडेच त्याच्याशीं बाईंनीं पुनर्विवाह केला होता. ऐपिंग गांवांतली एकुलती एक गाडी तो हाकीत असे. आत्तांची त्याची गाडी हाकायची तऱ्हा पाहून मात्र ही स्वारी कुठून तरी झोकून आलेली असावी हें स्पष्ट दिसत होतें.

पथिकाश्रमांत जें 'भूत' पाहुणा म्हणून उतरलें होतें त्याची बातमी हॉलला दिल्याशिवाय टेडीला थोडेंच राहावणार होतें! ती बातमी देऊन वर त्यानें पाहुण्याबद्दल हॉलच्या कानांत चांगलेंच विष ओतलें; आणि हॉलसाहेब बायकोची खरड काढण्याचे बेत करीत मोठ्या तोऱ्यानें घरीं आले.

पण उशिरा घरीं आल्याबद्दल त्याचीच पहिल्यानें खरड निघाली.

तरी झोपण्यापूर्वीं त्यानें बायकोला बजावलें, "हें बघ! हा जो पाहुणा तूं घेतला आहेस ना, त्याच्याबद्दल मला जबरदस्त शंका आहे. त्याचं सामान उद्यां येईल तें पहिल्यानें नीट तपास—"

"तुम्ही गप्प बसा हो!" कारभारणीनें त्याला दरडावलें, "माझ्या फंदांत पडायचं तुम्हांला काम नाहीं!"

* * *

अशा रीतीनें हा चमत्कारिक इसम फेब्रुवारीच्या ९ तारखेला अचानक कुठच्या तरी अज्ञात भागांतून आला आणि ऐपिंग गांवांत अवतरला. दुसऱ्याच दिवशीं त्याचें सामान आलें—आणि सामान पण सामान होतें! दोन ट्रंका होत्या, त्याचें विशेष कांहीं नाहीं. पण शिवाय एक पुस्तकांची पेटी होती. तींत कांहीं जाडीं बुकें होतीं, तर कांहीं शाईनें गिचमीड लिहिलेल्या लठ्ठ चोपड्या होत्या. आणखी सुमारें डझनावर खोके होते. त्यांत गवताचें भरताड होतें, त्यावरून आंत कांचेच्या बाटल्या भरलेल्या असाव्यात असा हॉलनें तर्क केला. खोके उचलून आंत आणण्यापूर्वी गाडीवानाशीं हॉल थोडी बातचीत करतो आहे तों पाहुणा उतावीळपणें बाहेर आला.

"चला, आणा त्या पेट्या उचलून! केव्हांचा वाट पहातोंय् मी" तो गरजला.

गाडीवानानें एक कुत्रा बरोबर आणलेला होता. त्याची नजर या बुवाजीवर जाण्याचा अवकाश, त्यानें नाक फेंदारायला नि गुरगुरायला सुरवात केली. हॉल कुत्र्यांना भ्यायचा; तो चटकन् मागें झाला. गाडीवानानें कुत्र्याला चाबकानें फटकारलें. पण त्याच्या आधींच त्यानें उडी मारून पाहुण्यांची एक तंगडी पकडली होती. त्यांची तुमान टरकन् फाटल्याचा आवाज सर्वांनीं ऐकला. दुसऱ्याच क्षणीं चाबकानें काम केलें आणि कुत्रा केकटत गाडी-खालीं जाऊन लपला. अर्ध्या मिनिटांत हें सर्व झालें. कोणी कांहीं बोललें नाहीं; आरडाओरडा मात्र सगळ्यांनीं केला.

पाहुण्यानें आपल्या फाटलेल्या मोज्याकडे पाहिलें, पायाकडे

पाहिलें. खालीं वाकण्यासाठीं किंचित् हालचाल केली; आणि काय त्याच्या मनांत आलें—एकदम वळून ताडताड उड्या मारीत तो आपला पायऱ्या चढून आंत गेला.

त्याला आतां माडीवर स्वतंत्र खोली मिळाली होती. तींत शिरून त्यानें धाडदिशीं दार आपटलें.

इकडे गाडीवान चाबूक घेऊन खालीं उतरला आणि रागारागानें कुत्र्याला शोधूं लागला. कुत्रा गाडीखालून चाकांच्या आऱ्यांतून मालकाकडे चोरून पहात होता.

हॉलनें आ वासला होता तो जरा वेळानें मिटला. तो म्हणाला, "त्याला चावला....नक्कीच चावला! मी जाऊन बघून येतों."

घरांत शिरून माडीवर पळतांना त्यानें बायकोला ही खबर दिली. वरतीं पाहुण्यांनीं आपटलेलें दार अर्धवट उघडें होतें. तें ढकलून हॉल आंत घुसला. कारण केव्हां एकदा जाऊन बिचाऱ्या पाहुण्याची विचारपूस करतों असें त्याला झालें होतें.

खिडक्यांचे पडदे ओढलेले होते. खोलींत जरासा अंधारच होता.

हॉलच्या दृष्टीला एक विलक्षण दृश्य पडलें. कुणीतरी आपल्याकडे पाहून हात उगारतो आहे असें त्याला वाटलें. पण तो हात मनगटापर्यंतच होता. त्याला पंजा नव्हता, बोटें नव्हतीं...एक पांढरें डोकेंही त्याला दिसलें. त्याच्यावर तीन काळे वाटोळे ठिपके दिसत होते. एखाद्या चिंध्यांच्या बाहुलीवर काळ्या शाईनें नाकडोळे रंगवावेत तसलें विचित्र दृश्य होतें तें. क्षणभरच हा प्रकार त्याला दिसला. लगेच त्याच्या छातींत कुणींतरी जबरदस्त ठोसा मारून त्याला मागें पाडलें आणि दरवाजा खाडकन् लावून त्याला आंतून कुलूप ठोकलें. हें सगळें एवढ्या झपाट्यानें घडलें कीं नीट निरीक्षण करायला त्याला वेळही मिळाला नाहीं.

हॉलच्या डोळ्यांपुढें काजवे चमकत होते. थोड्या वेळानें तो कसाबसा उठला आणि आपण पाहिलेला प्रकार काय असावा याचें नवल करीत जिन्यांत उभा राहिला.

दोन मिनिटांनीं हॉल खालीं पोंचला तेव्हां तिथें जमलेल्या बघ्या लोकांत मारे खडाजंगी उडालेली त्याला दिसली. कोणी म्हणत होते, 'हें पिसाळलेलं कुत्रं आहे; मारून टाका त्याला!' कोणी म्हणत होते, 'चावरीं कुत्रीं जवळ बाळगावींतच कशाला?' 'गरीब बिचाऱ्या त्या रोग्याला खरेंच कुत्रें चावलें असेल तर त्यानें तावडतोब इलाज करावा, नाहींतर वेडबीड लागेल' असेंही एकानें सुचवलें. या गडबडींत बापड्या हॉलला आपण जें दृश्य पाहिलें होतें त्याचाही विसर पडला!

बायकोनें विचारलें तेव्हां तो एवढेंच म्हणाला, "त्याला कांहीं मदत नको म्हणतो. आपण आपलं त्याचं सामान आंत नेऊन टाकूं या म्हणजे झालं!"

एवढें बोलणें होत आहे तोंच जिन्यांत बुवाजी पुन्हा प्रगट झाले.

"काय आहे रे?" त्यांनीं तिथूनच बोंब मारली. "केव्हां येणार आहे सामान तें?"

"आलों—आलों साहेब" गाडीवान बोलला, "पण—पण साहेब, तुम्हांला लागलं नाहीं ना फार?"

"मुळींच नाहीं" 'साहेब' म्हणाले. "सामान उचला आधीं."

त्यांनीं आपली तुमान व हातमोजे बदलले होते. बऱ्याच बघ्यांच्या ही गोष्ट ध्यानांत आली.

पाहुणा त्यांच्या अगदीं हात धुवून मागें लागला. त्याच्या सांगीप्रमाणें पहिला खोका जेव्हां माजघरांत नेण्यांत आला तेव्हां पाहुण्यानें त्याच्यावर हावरटपणानें झडप घातली आणि खोका

उचकटून आंतलें गवत तो भराभर इतस्ततः फेकूं लागला. मिसेस् हॉलच्या जाजमाची त्यानें जराही क्षिति बाळगली नाहीं.



खोक्यांतून बाटल्या निघाल्या—लठ्ठ लठ्ठ बाटल्या. त्यांत कसलींशीं चूर्णें होतीं. बारीक तोंडाच्या लहान बाटल्या निघाल्या. त्यांत कसलेसे पांढरे रस होते. नळीच्या आकाराच्या निळ्या बाटल्या निघाल्या. त्यांवर 'विष' म्हणून चिठ्ठया मारलेल्या होत्या. फुगीर पोटाच्या, किरट्या मानेच्या, छोट्या, मोठ्या, हिरव्या, पांढऱ्या, कांचेच्या बुचाच्या, साध्या बुचाच्या, लाकडी टोपणाच्या, खिट्टी-सारख्या बुचाच्या, दारूच्या बाटल्या, तेलाच्या बाटल्या–असे शेकडों बाटल्यांचे नमुने त्यानें काढले आणि ते सर्व रांगेंत मांडून ठेवले. कुठें? सगळीकडे. शेल्फावर, कट्टयावर, मेजावर, खिडकीच्या खालीं पुस्तकांच्या स्टॅंडवर, जमिनीवर, जिकडे तिकडे बाटल्यांचीच सभा भरली. ब्रॅंब्लहर्स्टच्या औषधी दुकानांतसुद्धा इतक्या बाटल्या नसतील.

हळुहळू सहाही खोके रिकामे झाले आणि मेजावर गवताचा ढीग सांचला. बाटल्यांखेरीज आणखी काय त्या खोक्यांतून निघालें असेल? कांहीं परीक्षणनलिका निघाल्या आणि अगदीं जपून बांधलेला एक छोटा तराजू निघाला.

खोके रिकामे होतांच पाहुणा लगेच खिडकीजवळ गेला आणि त्यानें कामाला सुरवात केली. सगळीकडे गवताचा कचरा पसरला आहे आणि शेगडींतला विस्तव विझायला आला आहे इकडे त्याचें बिलकुल लक्ष नव्हतें. आपल्या सामानांतली पुस्तकांची पेटी अद्याप बाहेर राहिली आहे याची त्याला पर्वा नव्हती. किंवा माडीवर गेलेल्या आपल्या ट्रंकांचाही विचार त्याला शिवत नव्हता.

मिसेस् हॉल त्याचें जेवण घेऊन आल्या त्या वेळीं तो आपल्या कामांत इतका गढून गेला होता, कीं त्यांनीं मेजावरचा सर्व केर झाडला आणि जरा जोरानेंच जेवणाचें तबक आपटलें तेव्हां कुठें त्याचें लक्ष तिकडे वेधलें. मग त्यानें किंचित् मान वळवून बाईकडे पाहिलें आणि लगेच पुन्हा मान फिरवली. बाईंना एवढेंच दिसलें कीं त्यानें चष्मा काढलेला आहे आणि त्याच्या डोळ्यांच्या खांचा फारच पोकळ वाटताहेत. घाईघाईनें त्यानें आपला चष्मा चढवला आणि बाईंना म्हटलें, "तुम्ही अशा दार ठोकल्यावांचून येत जाऊं नका बुवा. माझा हा प्रयोग इतका नाजुक आहे कीं मध्येंच दार उघडलेलं मिटलेलं त्याला मुळींसुद्धा चालत नाहीं."

"साहेब, आपण कुलूप लावत जा वाटल्यास" बाई घुश्शांत म्हणाल्या.

"हं. तेंच बरं होईल!" पाहुण्यानें म्हटलें.

"मी या गवताबद्दल विचारूं का जरा?"

"कांहीं विचारूं नका. गवताचा त्रास वाटत असेल तर

त्रिलांत घाला काय तें " आणि त्रस्तपणें एवढेंच बोलून पाहुणा थांबला नाहीं. तो तोंडांतल्या तोंडांत कांहीं शिव्याही हासडतो आहे अशी बाईंना दाट शंका आली.

एका हातांत बाटली, एका हातांत नळी घेऊन उभी असलेली ती मूर्ति म्हणजे उद्दामपणाचा अर्क वाटत होती. मिसेस् हॉलना त्याची भीतिच वाटली. पण त्याही कमी खंबीर नव्हत्या. त्यांनीं आपलें टुमणें चालूच ठेवलें—

" असंच आपलं म्हणणं असेल तर मला अदमास तरी—"

" घाला एक शिलिंग !—एक शिलिंग तर पुरेसा आहे ना ? "

" जशी आपली मर्जी ! " बाईंनीं उत्तर दिलें आणि लगेच मेजावर चादर पसरली.

त्या दिवशीं दुपारभर खोलीला आंतून कुलूप लावून पाहुणा शांतपणें काम करीत होता. मिसेस् हॉल म्हणतात, कीं फक्त एकदाच म्हणण्यासारखा मोठा आवाज त्यानें केला. बाटल्या खळ्कन् आपटल्यासारखें वाटलें; बाटली किंवा नळी जोरांत फेकल्यामुळें कांचा फुटल्याचा आवाज आला आणि पाहुणा पाय आपटीत येरझारा घालतो आहे असें वाटलें; काय गडबड आहे असें वाटून बाई दाराजवळ गेल्या आणि कान देऊन ऐकूं लागल्या.

" नाहीं–नाहीं–नाहीं ! माझ्यानें हें होत नाहीं !" आंतून शब्द येत होते. " तीन लक्ष, चार लक्ष ! प्रचंड जमाव ! फसलों, फसलों ! सबंध आयुष्य पुरायचं नाहीं !.... धीर धरूं ? कशाचा धीर धरूं ?... गाढव—मूर्ख !.... "



विचित्र पाहुण्याचें सामान पोचवणारा गाडीवान आणि टेडी यांची दुपारीं अचानक गांठ पडली, तेव्हां गाडीवान म्हणाला, " आजचा तो बुवा—माझं कुत्रं डसलेला सोंगाड्या— "

" त्याचं काय ?"

" तो काळा आहे. म्हणजे त्याचे पाय काळे आहेत. त्याची तुमान फाटली होती ना, तेव्हां पाहिलं मीं आंत. अरे, कातडीचा तांबूसपणा तरी दिसायचा ? नांव नको ! नुसतं काळं काळं ढुस्स होतं. "

" कमाल आहे ! आणि त्याचं नाक पहावं तर गुलाबी दिसतं !"

" खरं आहे तें " गाडीवान गंभीरपणें मान हलवून म्हणाला. " त्याचं कारण सांगूं तुला, टेडी ? तो माणूस काळा तर आहेच, पण गोरादेखील आहे. आणि त्याचीच तर त्याला लाज वाटते आहे !—"

" म्हणजे काय ?"

" अरे, अस्सल अवलाद नाहीं ही ! काळ्यागोऱ्याची मिश्र अवलाद आहे ! अन् झालंय् काय ? काळा नि पांढरा रंग नीट मिसळले नाहींत, त्यामुळें त्याच्या अंगावर काळे पांढरे डाग आहेत. मला माहिती आहे या गोष्टींची, म्हणून सांगतों. घोड्यांचा नसतो काळा पांढरा रंग ?—अगदीं तसंच !"

* * *

# ३ रिकाम्या बाहीचें रहस्य

विचित्र पाहुण्याच्या आगमनाची हकीकत मीं जरा विस्तृतपणें सांगितली. ती अशासाठीं कीं ऐपिंग गांवांत त्यानें किती खळबळ उडवली याची नीट कल्पना वाचकांना यावी. यानंतर दोन महिन्यांत विशेष घडामोड झाली नाहीं. शिस्त, टापटीप वगैरे बाबतींत मिसेस् हॉलशीं त्याच्या चकमकी झडल्या नाहींत असें नाहीं. पण दर वेळीं थोडीशी आणखी मूठ उघडली कीं बिचाऱ्या बाई गप्प बसत. आणि नवरा फार कुरकुर करायला लागला—कारण त्याला तंर या पाहुण्याची ब्याद कशी जाईल असें झालें होतें—कीं त्या म्हणत, "हें बघा, आणखी कांहीं दिवस जाऊं द्यात. सध्या आपल्याकडे दुसरं गिऱ्हाईक तरी आहे का? आणि तो कसाही असला तरी पैसे तर देतोय् वेळेवर? मग त्याच्या इतर भानगडींशीं करायचंय् काय आपल्याला? तसं म्हटलं तर नांव तरी कुठें विचारलंय् त्याचं आपण?"

पाहुणा रविवारींसुद्धा देवळांत जात नसे. तो लहरीप्रमाणें काम करायचा. कधीं कधीं पहाटे उठून खालीं यायचा अन् सरळ कामाला बसायचा. कधीं खूप उशीरा उठे आणि तासन् तास आपल्या खोलींत घिरट्या घाली, धूम्रपान करी किंवा शेगडी-जवळच्या त्या खुर्चीत बसून राही. गांवाबाहेर तर कुणाशींच त्याचा कांहीं व्यवहार नव्हता. त्याची वृत्तीही मोठी चमत्कारिक होती. कधीं कधीं याला कांहीं तरी असह्य पीडा होत आहे असें त्याच्या वागण्यावरून वाटे. एकदोनदा तर तो इतका चिडलेला दिसला कीं हातांत येईल ती वस्तु चुरगळायची, मोडायची,

फाडायची असें त्यानें चालवलें. आपल्याशींच बडबडण्याची त्याची संवय वाढतच चालली होती. मिसेस् हॉल अगदीं कान देऊन ऐकत, पण त्यांना त्याच्या बडबडींतला शेंडाबुडखाही कळत नसे.

दिवसा तो क्वचितच बाहेर जाई. संध्याकाळीं काळोख पडला कीं स्वतःला पुरता लपेटून घेऊन तो जायचा. अगदीं एकीकडच्या निर्जन रस्त्यांवरून, किंवा जिथें खूप झाडी वगैरे असेल अशा ठिकाणीं तो हिंडायचा. तो इतका जपून हिंडे तरी, त्याचा तो भोकरडोळी चष्मा आणि चिंध्यांत गुंडाळलेलें भुतासारखें थोबाड अवचित कुठून तरी उपटलेलें एकदोघां गांवकऱ्यांच्या नजरेस पडलें होतें आणि त्यांची फेंफें उडाली होती. काळोख पडल्या-नंतर कुणा मुलांना तो दिसला तर त्यांची पांचावर धारण बसा-यची. त्यांना मग स्वप्नांतसुद्धा हा बागुलबोवा दिसायचा. पण मुलांना जितका त्याचा तितकाच त्यालाही मुलांचा दुस्वास वाटे. त्यांना शक्य तेवढें टाळण्याचा तो प्रयत्न करी.

इतक्या विलक्षण व्यक्तीबद्दल गांवांत चर्चा झाली नसती तरच नवल ! त्याचा धंदा काय असावा याबद्दल ऐपिंगकरांत मतभेद होते. खुद्द मिसेस् हॉलना विचारलें तर त्या म्हणत, " पाहुणे शास्त्रीय प्रयोग करीत असतात ! " ते शब्द त्या अगदीं जपून उच्चारीत आणि ' शास्त्रीय प्रयोग ' म्हणजे काय असा कोणीं प्रश्न केला तर खाडकन् उत्तर देत " ज्यांचीं चार मोठीं मोठीं बुकं वाचून झालीं आहेत त्यांना कळतो त्याचा अर्थ. इतरांनीं त्या भानगडींत पडूं नये." आपल्या पाहुण्यांना नुकताच अपघात झालेला होता, त्यांत त्यांचा चेहरा नि हात विद्रूप झाले, त्यामुळें कुणालाही भेटायची त्यांची इच्छा नसते असाही खुलासा त्या करीत.

टेडी हेन्फ्रेच्या डोक्यांतून निघालेली एक कल्पना बरीच प्रसार

पावली होती. ती म्हणजे पाहुणा एखादा अट्टल गुन्हेगार असावा आणि पोलिसांचा ससेमिरा चुकवण्यासाठीं त्यानें ही युक्ति योजलेली असावी. पण तसें म्हणावें तर गेल्या दोन महिन्यांत ऐपिंगच्या पंचक्रोशींत तरी कुठें कांहीं मोठा खून-दरोडा पडल्याचें ऐकिवांत नव्हतें. अर्थात् हा साधा गुन्हेगार नसून एखादा कटवाला पंचमस्तंभी असावा हें ओघानेंच आलें. मि. गोल्ड नांवाच्या एका शाळामास्तरनें हेंच खरें धरून त्या दृष्टीनें थोडी गुप्तपोलिसी चालवली. ही गुप्तपोलिसी म्हणजे काय, तर जेव्हां जेव्हां पाहुण्यांची गांठ पडेल तेव्हां त्याच्याकडे रोखून पहायचें; आणि पाहुण्यांना स्वप्नांतसुद्धा ज्यांनीं पाहिलेलें नसेल अशा लोकांना गांठून त्यांना सूचक प्रश्न विचारायचे ! यांतून कांहीं निष्पन्न झालें नाहीं हें सांगायला नकोच.

कोणी या बुवाला एक निरुपद्रवी वेडा समजत; तर कोणी म्हणत, जत्रा-उरुसांतून यानें जर आपलें प्रदर्शन मांडलें तर हा फावड्यानें पैसे ओढील. पण त्याच्याबद्दल सर्वांचे तर्क भिन्न असले तरी त्याच्यावर नापसंतीचा शिक्का सर्वांनीं एकमतानें मारलेला होता. त्याचा तिरसटपणा शहरांत राहाणाऱ्या माणसाला कदाचित् समजूं शकला असता; पण ऐपिंगसारख्या खेड्यांत त्याचें लोकांना आश्चर्य वाटे. त्याचे विचित्र हातवारे, काळोख पडल्यावर गल्ल्याकुच्यांतून हिंडतांना लांब टांगा टाकीत जायची त्याची पद्धत, दिवे मालवून पडद्यांत राहायची नि कुणी चौकशा करायला लागलें तर त्याच्या अंगावर खेकसायची त्याची संवय, हे सगळे प्रकार कुणाला आवडण्यासारखे होते ?

गांवांतला एकुलता एक डॉक्टर कस् म्हणजे मोठा चांभारचौकस माणूस. त्यांतून पाहुण्यांनीं गुंडाळलेल्या कापडी पट्ट्या

अन् त्यांच्या त्या शेकडोंशें बाटल्या यांमुळें डॉक्टरसाहेबांची धंद्यांतली जिज्ञासा पण जागृत झाली. पहिल्या–पहिल्यानें अल-बत्या-गलबत्यांजवळ चौकशा करण्यांत त्यांनीं कांहीं दिवस घालवले. पण त्यांचें समाधान होईना. ईस्टर आला, गेला. एप्रिल संपला, मे महिनाही अर्धा झाला. मेच्या मध्याला इंग्लंडांत व्हिटसन् डे व व्हिटमन् डे हे सणाचे रविवार–सोमवार येतात. व्हिटसन् डेचा मुहूर्त साधून कांहीं तरी निमित्तानें वाघाच्या गुहेंत स्वतःच प्रवेश करायचा असें डॉक्टरसाहेबांनीं ठरवलें. नाहीं तरी ऐपिंग गांवची वाढती जननसंख्या लक्षांत घेऊन एक पगारी नर्स नेमणें जरूर होतें; त्यासाठीं फंड जमवायची कल्पना डॉ. कसनीं आपल्या कसदार डोक्यांतून काढली आणि पावतीबुक घेऊन त्यांनीं पथिकाश्रमावर हल्ला चढवला.

पण पाहुण्याच्या खोलींत प्रवेश मिळवल्यापासून दहाच मिनिटांत पांढरे फटक पडलेले डॉक्टरसाहेब बाहेर आले आणि सपाट्यानें रस्ता गांठून धूम पळत सुटले. ऐपिंगचा 'व्हिकार' ऊर्फ गांव-गुरु बंटिंग हा डॉक्टरांचा दोस्त होता. त्याच्याकडे जाऊन डॉक्टरसाहेब धापा टाकीत म्हणतात, "तो—तो—पथिकाश्रमांतला पाहुणा—"

"काय झालं त्याचं ?" खास 'व्हिटसन् 'साठीं लिहून काढलेल्या प्रवचनावरून शेवटचा हात फिरवीत बंटिंगनीं विचारलें.

"आधीं मला प्यायला दे कांहीं तरी" कस् मटकन् खालीं बसून म्हणाला.

बंटिंगच्या घरीं फक्त हलक्या दर्ज्याचें 'शेरी' मद्य असे. तें ग्लासभर पाजल्यावर डॉक्टर जरा ताळ्यावर आला आणि त्यानें आपला ताजा अनुभव बंटिंगना सांगितला.

" आंत गेलों—" तो धापा टाकत म्हणाला, " अन् फंडाला आंकडा टाका म्हटलं. 'पाहीन' म्हणाला; पण खिशांतले हातसुद्धा बाहेर काढले नाहींत. खुर्चींत बसलेला होता. मधून मधून शिंका देत होता. भोवतीं बाटल्यांचा नि नळ्यांचा खच पडला होता. सहज बोलल्यासारखं विचारलं मीं, 'संशोधन करीत असतां ?' 'चिकार !' त्यानें उत्तर दिलं. मी म्हणालों, 'अस्सं.' तो म्हणाला, 'एक अनुपान होतं माझ्याजवळ. फार मोलाचा कागद होता. तो एकदा उडून शेगडींत पडला नि जळला....' आणि हें सांगतांना हावभाव करण्यासाठीं त्यानें एकदम खिशांतला हात काढला—"



" बरं मग ? "

" अरे, मग काय ? हात नव्हताच. म्हणजे बोटंबिटं नव्हतीं. पंजाच नव्हता त्याला. नुसती रिकामी बाही ! मला वाटलं, हात तुटलेला असेल. बुचाचा बसवलेला असेल. पण कसचं काय रे ? अजिबात कांहीं नव्हतं. मीं अगदीं बाहींत पाहिलं. बरं, लाकडी हात काढून ठेवलेला असेल म्हणावं, तर मग बाही ताठ कशी ?

मी इतका दचकलों—बोलून गेलों, ‘ बाप रे ! ’ तसं लगेच त्यानें माझ्याकडे आपल्या भोकरडोळ्या चष्म्यांतनं पाहिलं. ”

“ पुढें काय ? ”

“ पुढें ? पुढें मीं धीर करून विचारलंच त्याला, ‘ काय हो, अशी रिकामी बाही कशी हलवतां तुम्ही ? ’

“ तो म्हणाला, ‘ रिकामी बाही ? ’ मी म्हणालों, ‘ होय. रिकामी बाही.’ तसं तो म्हणतो,‘ तुम्हीं पाहिलीत रिकामी बाही ? ’ मी म्हणालों, ‘ होय, पाहिली. ’ तो अगदीं सावकाश पावलं टाकीत माझ्याजवळ आला आणि म्हणतो, ‘ पुन्हा पहायचीय् ? ’ अन् असं बोलून त्यानें अगदीं धीरे धीरे खिशांतला हात पुन्हा बाहेर काढला अन् माझ्या अगदीं डोळ्यांजवळ धरला—बंटिंग ! तुला काय सांगूं ? खरोखरच हात नव्हता तो. कांहींच नव्हतं. नुसती रिकामी बाही होती !

“ मी किती वेळ त्या बाहीकडे पहात होतों कुणास ठाऊक ! मी घाबरून गेलों होतों नि अंगाला दरदरून घाम सुटला होता. पण कांहीं तरी बोलणं भाग होतं, म्हणून बोलून गेलों, ‘ आंत तर कांहींच नाहीं ! ’ खरोखर आंत कांहींच नव्हतं रे बंटिंग ! पोकळ रिकामी बाही होती. पण आंत काठीबिठी घातल्यासारखी ती ताठ उभी होती. त्यानें ती ताणून माझ्या अगदीं नाकाजवळ आणला. फार तर सहा इंच दूर ! आणि—”

“ आणि काय ? ”

“ आणि एकदम माझं नाक चुरगळलं गेलं ! ”

बंटिंग हसायला लागला.

“ तूं हसतोस ? ” कस् रागारागानें किंचाळला, “ तुला हसायला काय लागतं ? पण खरंखुरं देवाशपथ सांगतों, त्या बाहींत कांहीं नव्हतं. मला हात दिसला नाहीं, बोटं दिसलीं नाहींत,

कांहीं नाहीं. आणि तरीसुद्धा माझं नाक कुणीं तरी चिमटींत धरून पिरगळलं ! ”

* * *

# ४ डोकें ताळ्यावर राहिलें नाहीं

ऐपिंगचे गांवगुरु बंटिंग यांच्या घरीं जो दरोडा पडला त्याची माहिती आपल्याला मुख्यतः ते स्वतः व त्यांची पत्नी या दोघांकडूनच मिळते. ‘ व्हिटमन् डे ’च्या पहाटे हा प्रकार घडला. बंटिंगबाईला असा भास झाला कीं आपल्या निजायच्या खोलीचें दार उघडलें अन् परत लागलें. तिनें पहिल्यानें नवऱ्याला उठवलें नाहीं. बिछान्यांत उठून बसून ती ऐकायला लागली. तेव्हां शेजारच्या खोलींतून कुणी तरी दप्प दप्प पावलें टाकीत येऊन जिन्याकडे गेल्यासारखें तिला वाटलें. माणूस अनवाणीच चालत असावा. एवढी खात्री झाल्यावर तिनें पतिराजांना उठवलें.

रेव्हरंड मि. बंटिंग यांनीं चष्मा चढवला, बायकोचें ड्रेसिंग गाऊन अंगांत घातलें आणि दिवा न लावतां अंधारांतच जिन्याकडे जाऊन ते वरच्या पायरीपाशीं उभे राहिले नि कान देऊन ऐकूं लागले.

खालीं आपल्या अभ्यासिकेंत कांहीं तरी खसबस चालली आहे असें त्यांना वाटलें. एकदा तर कुणी तरी जोरांत शिंकल्याचाही आवाज आला.

बंटिंगनीं पटकन् जाऊन शेगडींतले कोळसे सारायची सळी आणली आणि बिलकुल आवाज न करतां ते जिना उतरूं लागले.

पहाटे चाराचा सुमार होता तो. खालच्या खोलींत चाललेली खसबस आणि बंटिंगच्या पायांखालीं जिन्याची होणारी करकर यांखेरीज सर्वत्र सामसूम होती. बंटिंग खालीं उतरले तेव्हां अभ्यासिकेच्या दारांतून मेणबत्तीचा उजेड आलेला त्यांना दिसला.

बंटिंगची बायकोही खालीं आली आणि त्या खोलीकडे पांढऱ्या फटक चेहऱ्यानें पाहूं लागली.

डेस्काचा खण उघडून चोर आंतले पैसे मोजूं लागल्याचें बंटिंगना कळलें तेव्हां मात्र त्यांना राहवेना. मोठ्या माराकुटीनें सांठवलेली त्यांची ती कौटुंबिक बचत होती. किती म्हणाल तर अडीच गिनी ! तिच्यावर चोरानें झडप घालतांच गुरुजींचा सगळा त्वेष उसळून आला. हातांत सळी घट्ट पकडून त्यांनीं लाथेनें दरवाजा उघडला आणि आंत घुसून गर्जना केली, "खबरदार !"

दुसऱ्याच क्षणीं त्यांना भयंकर आश्चर्याचा धक्का बसला. कारण त्यांची गर्जना ऐकायला खोलींत कोणीच नव्हतें.

—आणि तरीसुद्धा बंटिंग पतिपत्नी दोघेंही शपथेवर असें सांगायला तयार आहेत, कीं त्याच क्षणाला खोलींतून कोणी तरी चालत असल्याचा भास आपल्याला निश्चित झाला. दोघांनींही एकमेकांकडे पाहिलें, पण त्यांच्या तोंडून शब्द फुटेना.

अशा मूढ अवस्थेंत अर्धे मिनिट गेल्यावर दोघांनीं खोलीची कसून तपासणी केली. डेस्काखालीं, पडद्याआड, खुर्च्यांमागें, सगळीकडे पाहिलें. मि. बंटिंगनीं तर सळी घेऊन धुराडेंही चांचपलें, पण चोराचा पत्ता नाहीं.

"च्यॅः !" मि. बंटिंग उद्गारले, "अन् मग मेणबत्ती पेटलीय् ती कुणीं लावली ?"

मिसेस् बंटिंग म्हणाल्या, "खण तरी कुणीं उघडला?"

"हो ना! पैसे तर चक्क गेलेच आहेत."

इतक्यांत बाहेर कुणी तरी शिंकल्याचा आवाज आला. धावत दोघें खोलीबाहेर आलीं. सैंपाकघराचा मागचा दरवाजा खाडकन् आपटला होता.

मि. बंटिंग विद्युद्वेगानें मागच्या दारीं गेले. त्यांनीं आसमंतांत दूरवर निरखून पाहिलें.

—रस्त्यावर चिटपांखरूंसुद्धा नव्हतें.

त्याच पहाटे पथिकाश्रमांतही एक चमत्कार घडला. मिसेस् हॉलना तळघरांत कांहीं काम होतें. त्यांच्याबरोबर हातांत मेण-बत्ती धरून हॉल पण गेला होता. मध्येंच बाईंना आठवण झाली कीं आपल्याला सर्दी झाली आहे, सार्सापरिला घेतलें पाहिजे. त्यांनीं पतिराजांना वर पाठवलें.

वर गेल्यावर हॉलनें सहज पाहिलें तर पाहुण्याच्या खोलीचें दार उघडें! त्याला जरा आश्चर्य वाटलें. बाटली घेऊन तो खालीं आला तेव्हां आश्रमाच्या पुढच्या दरवाजाकडे त्याची नजर गेली. काल रात्रीं आपण अडसर लावला होता हें त्याच्या पक्कें लक्षांत होतें. आतां पहातो तों अडसर काढलेला! त्याला आणखीनच आश्चर्य वाटलें!

तो तसाच धावत पुन्हा वर गेला. पाहुण्याच्या खोलींत शिरला. तिथें त्याला आश्चर्याचा तिसरा धक्का बसला.

कारण खोली रिकामी तर होतीच. पण पलंगावर नि खुर्चीवर पाहुण्याचे कपडे पडलेले होते.कपडे आणि कापडी पट्ट्यांचीं भेंडोळीं!

पाहुण्याची हॅट देखील पलंगाच्या खुंटीवर लटकत होती.

हॉल आ वासून बघतो आहे तों खालून हाक ऐकूं आली,

"का हो, मिळाली कीं नाहीं तुम्हांला बाटली?"

"आलों—आलों—" करीत हॉल लगबगीनें खालीं गेला आणि त्यानें अगोदर बायकोला तो चमत्कारिक प्रकार सांगितला.

मिसेस् हॉलचा विश्वास बसेना.

तितक्यांत मागें कुणी तरी शिंकलें.

बाईंनीं झटकन् मागें पाहिलें. हॉल तर बराच दूर उभा होता. पण दुसऱ्याच क्षणीं उडी मारून तो तिच्याजवळ आला.

मिसेस् हॉलनीं पलंगाजवळ जाऊन उशी, कपडे चाचपून पाहिलीं.

"थंडगार लागताहेत!" त्या म्हणाल्या, "हा गृहस्थ बाहेर गेल्याला कमींत कमी तास झाला असेल!"

त्या हें बोलत असतांनाच एक अविश्वसनीय प्रकार घडला. पलंगावर विस्कळित पडलेले कपडे आपसूक एकत्र झाले; आणि मग कांठाजवळ सरकून एकदम खालीं पडले. जसे कांहीं कुणीं तरी ते हातांनीं गोळा करून बाजूला सारले होते. नंतर हॅटनें खुंटीवरून उड्डाण केलें: आणि ती बाईच्या तोंडावर येऊन आपटली. मग वॉशस्टँडवरचा साबण असाच सपाट्यानें आला. त्यानंतर खुर्चीवरचे कपडेही खालीं पडले. खुर्ची 'हाः हाः हाः!' करून हसली,—आवाज अगदीं पाहुण्याच्या हसण्यासारखा वाटला—तिनेंही उंच उडी घेतली, कोलांटी मारून पाय वर केले. आणि मग झटकन् म्हशीच्या शिंगांसारखे आपले पाय एकदा हॉलच्या नि एकदा त्यांच्या बायकोच्या अंगावर रोखले.

हॉल नवराबायकोंना तिनें खोलीबाहेर हुसकूनच काढलें.

मिसेस् हॉलना जवळजवळ मूर्च्छा आली होती. त्यांच्या नवऱ्यानें अन् मिलीनें सावरून त्यांना शुद्धीवर आणलें.

तळघराच्या पायऱ्या चढून दोघें वर येत असतांना पुढचा

दरवाजा एकदम उघडला नि परत मिटला असें त्यांना वाटलें. पण जवळपास कोणी आढळलें नाहीं. तेव्हां दोघें झपाट्यानें वर निघालीं.

इतक्यांत जिन्यांत कोणी तरी शिंकलें. पण हॉलला वाटलें, आपली बायको शिंकली आणि तिला वाटलें हा शिंकला.

मिसेस् हॉल पाहुण्याची खोली उघडून आंत शिरल्या आणि मुखस्तंभासारख्या उभ्या राहिल्या. हॉलनें वर्णन केलें तशीच सर्व परिस्थिति होती.

"भूत—भूत !" बाई जोरजोरांत बरळायला लागल्या, "त्या बाबाला भूतबाधा झाली आहे ! अगदीं नक्कीच ! मीं वाचल्या आहेत अशा गोष्टी वर्तमानपत्रांतनं. टेबलं काय चालतात, खुर्च्या काय नाचतात—एक ना दोन, नाना चेष्टा !"

हॉल म्हणाला, "हें बघ, याचा घोट घे तूं, जरा बरं वाटेल तुला—"

पण बाई आणखीच जोरांत ओरडल्या, "घालवून द्या त्याला बाहेर ! धक्के मारून घालवा. पुन्हा पाऊल टाकलन् इथें तर कांडात काढा त्याचं !—पण मीच मेली मूर्ख ! कशाला घरांत घेतलं त्याला ! मला टवळीला समजायला पाहिजे होतं. काय त्याचा तो अवतार ! तो भोकरडोळ्या चष्मा, तीं फडकीं काय गुंडाळलेलीं अंगाला...."

बाईंची बडबड सारखी चालूच होती.

हां हां म्हणतां पथिकाश्रमांतल्या या घडामोडीची खबर सगळ्या गांवाला मिळाली; आणि पथिकाश्रमाच्या पानगृहांत बघे, चांभार-चौकस अन् फुकटे सल्लागार यांची एकच गर्दी उसळली. पाहुण्याचा कांहीं तरी बंदोबस्त करावा याबद्दल एकमत झालें, पण काय करावें तें ठरेना. शेवटीं त्याच्या दारावर धक्के मारून आंत घुसावें कीं काय याची चर्चा चालू असतां आणखी एक आश्चर्य घडलें.

पाहुण्याच्या खोलीचें दार अकस्मात् उघडलें आणि तो स्वतःच खालीं आला. पुन्हा आपला गृहस्थ नेहमींप्रमाणें नख-शिखान्त कपड्यांनीं गुंडाळलेला दिसत होता; आणि भोकर-डोळ्या चष्म्यांतून जगाकडे पहात होता. कांहीं विशेष घडल्याचें त्याला वाटत असावें असें त्याच्या चेहऱ्यावरून तरी दिसत नव्हतें. तो खालीं आला आणि शिंकत शिंकत माजघराकडे चालला. वाटेंत सार्सापरिलाची बाटली पडली होती. मघांच्या गोंधळांत हॉल ती उचलून ठेवायला विसरला होता. पाहुण्यानें बाटलीवर अधाशासारखी झडप घातली आणि तिच्यासह माजघरांत शिरून दार खाडकन् लावून घेतलें.

ऐपिंगचें शिष्टमंडळ एकमेकांच्या तोंडांकडे पहात राहिलें !



" मला कांहीं गोष्टींचा खुलासा हवा आहे. " पथिकाश्रमाच्या पानगृहांत सर्व लोकांच्यासमोरच हॉलबाई आपल्या पाहुण्यांची हजिरी घेत होत्या, " आपले पैसे अजून आलेले नाहींत असं तुम्हीच म्हणतां. आणि आतां बिलासाठीं हटून बसल्याबरोबर खिशांत थोडी चिल्लर आहे ती देतों म्हणतां, हें कसं काय? कुठून आली ही चिल्लर ? सांगा ! दुसरं असं—"

मध्यें बाई आवंढा गिळण्यापुरत्या थांबल्या असतील तेवढ्याच. पुन्हा त्यांनीं आपली गाडी चालू केली, " माडीवरच्या माझ्या खुर्चीची तुम्हीं काय भानगड केलीत तें सांगा. आणखी असं कीं तुमची खोली रिकामी होती नि दारांतून तुम्ही आंत शिरलां नाहींत आणि तरी थोड्या वेळानें आंत दिसलांत, तें कसं काय? आणि—"

बाईंनीं पाहुण्यांवर आणखी किती भडिमार केला असता तें समजायला मार्ग नाहीं. कारण अकस्मात् त्यांची वाचा बसल्या-सारखी झाली. काय–झालें तरी काय असें ?

सांगतों काय झालें तें. पाहुण्यांनीं आपलें बँडेज काढलें.

आपल्याला आतां कांहीं तरी चमत्कारिक बघायला मिळणार इतपत प्रत्येकाची अपेक्षा होतीच. जखमेचे खोल व्रण, देवीचे भेसूर डाग, भाजून विद्रूप झालेली कातडी अशा सर्व प्रकारांना त्यांची तयारी होती. तसें कांहीं दिसलें असतें तर त्यांत त्यांना विशेष वाटलें नसतें. पण कांहींच न दिसणें—या गोष्टीला त्यांची तयारी नव्हती !

कापडी पट्ट्या नि कृत्रिम केस यांचा चोळामोळा जेव्हां कोपऱ्याकडे भिरकावला गेला तेव्हां त्याचा हल्ला चुकवण्यासाठीं प्रेक्षकांत एकच गोंधळ उडाला. एकमेकांच्या अंगावर काय पडले, पायऱ्यांवरून काय गडगडले—

आणि एवढा गोंधळ उडण्याचें कारण सर्वांची नजर पाहुण्यां-कडे होती. त्याची कांहीं तरी न समजण्यासारखी बडबड चालू होती. तो हातवारेही जोरजोरांत करीत होता. पायांतल्या बुटां-पासून तों शर्टाच्या कॉलरीपर्यंत त्या पिसाट पाहुण्याचा अवतार नेहमींसारखाच होता. पण गळ्यापासून वर मात्र कांहीं नव्हतें—म्हणजे अक्षरशः कांहीं नव्हतें.

—पाहुण्याला मुळीं डोकेंच नव्हतें !

* * *

५

# फरारी

पथिकाश्रमांतून माणसांचे अस्ताव्यस्त नमुने धडाधड बाहेर फेकले जात आहेत हें दृश्य रस्त्यावरच्या लोकांना दिसलें. मिसेस् हॉल बाहेर कोसळलेल्या त्यांनीं पाहिल्या. टेडी हेन्फ्रीनें सराईतपणें उडी मारली नसती तर तो बाईंच्या अंगावर आपटला असता हेंही त्यांनीं पाहिलें. सैंपाकघरांतून धावत आलेल्या मिलीला जेव्हां अवचित तें बिगरडोक पाहुण्याचें धड सामोरें आलें तेव्हां तिनें घाबरून फोडलेल्या किंकाळ्याही सर्वांना ऐकूं गेल्या. मग एका-एकीं किंकाळ्या थांबल्या.

आणि मग एकच धावाधाव सुरू झाली. जत्रेला आलेले बहुतेक प्रेक्षक तर पथिकाश्रमाकडे धावलेच, पण जत्रा गाजवणारे ते मिठाईवाले, कसरतपटु नि जादूगार या सर्वांनींदेखील तिकडेच धूम ठोकली. खाणावळीभोवतीं चाळीस पन्नास माणसें तर हां हां म्हणतां जमलीं आणि ही संख्या जसजशी आणखी फुगत गेली तसतसा त्यांचा आरडाओरडा नि फुकट फौजदारीही वाढत गेलीं. त्यांच्या प्रश्नांच्या माऱ्याला उत्तरें देतां देतां हॉलबाईंच्या नाकीं नऊ आले. शेवटीं तिला बेशुद्धावस्थेंतच उचलून आंत न्यावें लागलें. त्यामुळें गलका आणखीच वाढला—

"चू–चू–चू ! पाजी, बदमाष ! सैतान लेकाचा !"

"काय केलन् हो त्यानें ?"

"काय काय विचारतां ? अहो, सुरा उगारलान् तिच्यावर ! आणि दुसरं असं कीं....त्याला डोकं नाहीं !"

"डोकं नाहीं ?—"

“ अजिबात डोकं नाहीं. म्हणजे लाक्षणिक अर्थानें बोलतोंय् असं नका समजूं. अहो, त्याला मस्तक नाहीं मस्तक ! ”

“ काय सांगतां राव ? अहो, ट्रिक असेल एखादी ट्रिक— ”

“ फर्रदिशीं बँडेज् ओढलन् ! या डोळ्यांनीं पाह्यलं मीं ! ”

म्हणतां म्हणतां जमावानें खाणावळीचा बंद दरवाजा गांठला होता आणि त्यांच्यांतले आघाडीवरचे सेनानी दरवाज्यावर धडका मारीत होते. इतक्यांत गर्दी बाजूला सारीत दुसऱ्याच दोन महत्त्वाच्या व्यक्ति पुढें घुसल्या. या व्यक्ति म्हणजे हॉल आणि हवालदार जॅफर्स.

हवालदारसाहेब नुसते आलेले नव्हते. त्यांच्या हातांत पकड-वॉरंट होतें. लोक जेव्हां विचित्र पाहुण्याच्या ‘ बिनडोक ’ पणा-बद्दल आगंतुक माहिती द्यायला लागले तेव्हां जॅफर्सनें गर्जून सांगितलें, “ डोकं असो किंवा नसो, त्याला पकडून गिरफदार करण्याचा सरकारचा हुकूम आहे, आणि तो मी बजावल्याखेरीज राहात नाहीं.”

हॉल पुढें गेला. माजघराचें दार उघडेंच होतें. तिथें उभें राहून त्यानें नाटकी सुरांत म्हटलें, “ हवालदारसाहेब ! या पुढें, बजावा तुमची ड्यूटी ! ”

जॅफर्स आंत शिरला. हॉल त्याच्या मागोमाग.

खोलींतल्या अंधुक प्रकाशांत पाहुण्याचें कबंध त्यांना सामोरें आलें. हातमोजा घातलेल्या त्याच्या हातांत पावाचा अर्धवट खाल्लेला तुकडा होता.

“ काय पाजीपणा आहे हा ? ” तें कबंध वसकन् ओरडलें.

कॉलरीच्या पोकळींतून निघालेल्या त्या आवाजानें जॅफर्स भ्याला नाहीं. तो मल्खपणें म्हणाला, “ और वल्ली दिसते खरी !

पण मिष्टर, वॉरंटांत म्हटलं आहे 'बॉडी'. त्या 'बॉडी'ला 'हेड' असलंच पाहिजे अशी कांहीं अट घातलेली नाहीं यांत—"

"खामोष! मागें सरा—"

अकस्मात् पाहुण्यानें आपल्या हातांतला पाव फेकून दिला आणि मेजावरच्या सुरीवर तो झडप घालणार तोंच हॉलनें चपळाई करून ती उचलली. पाहुण्यानें डाव्या मुठीचा एक जबरदस्त तडाखा जॅफर्सच्या तोंडावर हाणला. जॅफर्स अजूनही वॉरंटबद्दल कांहीं तरी बडबडत होता. त्याचें तोंड एकदम बंद पडलें; पण हात मात्र विद्युद्वेगानें पुढें आले. एका हातानें त्यानें पाहुण्याचें कुणालाही न दिसणारें नरडें दाबलें आणि दुसऱ्या हातानें त्याचें मनगट घट्ट पकडून ठेवलें. याचा मोबदला म्हणून एक जोराची लाथ त्याच्या पायाच्या नळीवर बसली आणि तो विव्हळत तंगडी झाडूं लागला. पण हात मात्र त्यानें ढिले सोडले नाहींत. या दोघांची झुंज चालू असतांना हॉल हातांत सुरी रोखून दरवाज्याशीं उभा होता. दोघांची हाणामारी, ठोसाठोशी जोरांत चालू होती. एकमेकाला पाडीत रेटीत ते दरवाज्याकडे चालले तशी वाटेंतली एक खुर्ची कोलमडली आणि पार खिळखिळी झाली.

"पाय पकडा त्याचे!" जॅफर्स दांतांच्या फटींतून किंचाळला.

हॉल तसें करणार तोंच त्याच्या बरगड्यांत एक लाथ बसली. जॅफर्सला खालीं पाडून पाहुणा त्याच्या छातीवर स्वार झाला आणि लगोलग तीनचार दारूच्या बाटल्याही बॉंबगोळ्यांप्रमाणें येऊन आपटल्या. त्यामुळें कांचांचे तुकडे जिकडे तिकडे उडाले आणि एकंदर वातावरण 'फेसाळ' बनलें. शत्रूला चीत करणारा विचित्र पाहुणा एकाएकीं ओरडला, "शरण—मी शरण आलोंय्—अयाई ग!"

दुसऱ्याच क्षणीं तो धापा टाकीत उभा राहिला. त्याला आतां डोकें तर नव्हतेंच, पण हातदेखील नव्हते. दोन्ही हातमोजे त्यानें ओढून काढले होते. हात नाहींत मग हातकड्या घालणार कशा ? सर्व जण गोंधळांत पडले आहेत तेवढ्यांत पाहुण्यांचा पोशाख मटदिशीं खालीं बसला आणि डोळ्याचें पातें लवतें न लवतें तों त्याचें स्थित्यंतर होऊं लागलें. हें काय होत आहे याचा पहिल्यानें कोणाला उमजही पडला नाहीं. बूट-मोजे केव्हांच भर्रदिशीं निघाले. पाटलोण एका लाथेसरशीं मेजाखालीं जाऊन पडली. मग पाहुणा खाडदिशीं उभा राहिला. म्हणजे नुसतीं सदरा नि जाकीट उभीं राहिलीं; कारण उठतां उठतांच त्यानें कोट दूर भिरकावला होता.

तुफान वेगानें हा प्रकार चालू होता. जॅफर्सच्या डोक्यांत त्याचा पुरता संदेश मिळेतों पाहुण्यांचें जाकीटही अंगाबाहेर पडत होतें. जॅफर्सनें झडप घालून तें पकडलें. पण त्यामुळें तें आणखीच झटदिशीं निघून आलें आणि नुसताच सदरा नाचत राहिला.

" पकडा—पकडा त्याला !" जा तो ओरडत सुटला, " एकदा तो कपड्याबाहेर पडला कीं निकालच लागला !"

त्या पांढऱ्या सदऱ्यावर सर्वजण तुटून पडले.—निकाल ?

सर्वांत पुढें हॉल होता. सदऱ्याची उजवी बाही सपाट्यानें आली आणि हॉलच्या नाकावर ठोसा बसला. हॉलची हालचाल बंद पडली आणि बाकीचेही दचकून पांगले.

अदृश्य डोक्यांतून सदरा झटक्यानें बाहेर निघतो आहे असें दृश्य दिसलें तेव्हां जॅफर्सच्या तोंडचें पाणी पळालें. पुढें धावून त्यानें सदरा पकडला आणि दुसऱ्या क्षणीं पाहुण्यांचें तें शेवटचें वस्त्रही निघून आलें.

त्याच्या मागोमाग एक सणसणीत गुद्दा येऊन हवालदाराचें मुस्काट फुटलें. त्यानें वेड्यासारखा आपला सोटा काढला आणि हाणला. त्यामुळें टेडी हेन्फ्रेचें टकुरें फुटलें.

जो तो ओरडत सुटला, "धावा, धावा—पळा!" "मारा त्याला!" "पकडा—पकडा!" "इकडून गेला—तिकडून सटकला..." "हा बघा धरला!" आरडाओरड नि हाणामारी याला कांहीं सुमारच राहिला नाहीं. थोडक्यांत सांगायचें म्हणजे प्रत्येकजण घसा फोडीत होता आणि जवळ सांपडेल त्याला बडवीत होता. जॅफर्सच्या थोबाडांत पुन्हा एकदा मार बसला. तो सटदिशीं मान फिरवतो तों कशाला तरी त्याचे पाय अडखळले. कुणाची तरी धिप्पाड, रुंद छाती असावी.

"सांपडला!" जॅफर्सनें आरोळी ठोकली. तेवढ्यांत रेटत, गडगडत ते दारापर्यंत पोचले. तसेच दाराबाहेर लकटले गेले. जॅफर्सची आरोळी ऐकून आणखी लोक दाराकडे धावले.

हा लोंढा दाराबाहेर घुसला तेव्हां जॅफर्स खालीं पडलेला होता. त्याचा चेहरा जांभळा निळा झाला होता, शिरा ताठलेल्या होत्या; पण हातांनीं मात्र तो आपल्या अदृश्य शत्रूशीं झगडत होता.

पण ते हात तरी किती वेळ काम करणार? लवकरच त्यांची पक्कड ढिली झाली. आणि जॅफर्सचे दोन्ही हात दोन्ही बाजूंना पडले.

पुन्हा एकदा 'पकडा–पकडा'च्या आरोळ्या झाल्या. एक नवखा तरुण कुठून तरी धावत आला. त्यानें कांहीं तरी पकडल्यासारखें केलें. त्याला तें साधलें नाहीं. तोही कोलमडून जॅफर्सच्या देहावर पडला.

नंतर जरा दूर रस्त्यांत एक बाई ओरडली. कोणी तरी तिला धक्का मारून गेलें असावें. पलीकडे एका कुत्र्याच्या पेकाटांत लाथ बसली असावी; कारण तें एकदम केकटत सुटलें.

बघे लोक नुसते भेदरल्या नजरेनें पहात राहिले. कुणी नुस-तेच पहात होते; कुणी हातवारे करीत होते. पण सर्वत्र भीषण शांतता होती.

मग शांततेनंतर वावटळ यावी तद्वत् एक जबरदस्त भीतीचा झोत आला आणि सगळ्या गांवभर—नव्हे, आसपासच्या पंच-क्रोशींत पसरला—

फ—फ—फरारी झाला....

अदृश्य माणूस फरारी झाला. कुठें गेला असेल तो ?

* * *

## ६ मार्व्हेल म्हणजे आश्चर्य !

ऐपिंग गांवापासून दीड मैलावर येतां ?

ती रस्त्याच्या कडेला बसलेली एक व्यक्ति पहा. प्रशस्त गोटोळा देह, वाटोळा विसविशीत चेहरा, लांब सरळ नाक, टोक-दार दाढी असें या माणसाचें थोडक्यांत स्वरूप दिसतें. मऊ, फरफरीत रेशमी हॅट त्यानें घातलेली आहे आणि त्याच्या पोशा-खांत ज्या ठिकाणीं बटनें असावींत अशा बऱ्याच ठिकाणीं बुटाच्या लेसीचे तुकडे दिसत आहेत; त्यावरून स्वारी अजून संसारांत पडलेली नसावी असाच कुणीही तर्क करील.

या गृहस्थाचा सध्याचा उद्योग म्हणजे पायांतून काढून ठेव-लेल्या आपल्या बुटांच्या दोन जोडांकडे उगाच पहात बसणें एवढाच दिसतो. ती पहाण्याची दृष्टिही किती आळसट, सुस्त आहे बघा.

मि. टॉमस मार्व्हेल यांची जवळ जवळ प्रत्येकच क्रिया सुस्त नि आळसटपणानें भरलेली असायची. या वेळीं आपल्या बुटांकडे पहात असतांना त्यांच्या मनांत मंद गतीनें विचार चालले होते ते पुढीलप्रमाणें—

हा आपला एक नंबरचा बुटांचा जोड मोठा झक्क आहे. यापूर्वी कधींही असे भक्कम बूट आपल्याला मिळालेले नव्हते. पण मोठे किती? अन् हा दोन नंबरचा जोडा पायांना कसा फिट्ट बसतो! उकाड्याच्या दिवसांत वापरायला मजा वाटते. पण गारठ्यांत? पावसाळी हवा असेल तेव्हां? छे छे! बिलकुल कामाचे नाहींत. कारण त्यांचे तळवे पातळ किती? पार भिजून जातात!

मागून कुणाचा तरी आवाज आला तरी मार्व्हेल चमकला नाहीं. इतका तो आपल्याच तंद्रींत होता—

"किती झालं तरी बूट तर आहेत ना ते?"

"**बूट** आहेत!" मान जरा कलती करून पुन्हा एकवार आपल्या त्या इस्टेटीकडे पहात मार्व्हेलनें कबूल केलें. "धर्मादाय बूट म्हणून बरे शोभतील. मी एवढाच विचार करतों आहें कीं यांतले जास्ती बेढब बूट कोणते?—हे कीं ते? तुम्हीच सांगा राव!"

आणि असें बोलत बोलतच मार्व्हेलनें वळून मागें पाहिलें. आपल्याशीं बोलणाऱ्या या गृहस्थाचे बूट कसे आहेत तें बघून त्याची-आपली तुलना करावी असाही एक आळसट विचार त्याच्या मनांत डोकावला होता.

पण त्याला आपल्या चार बुटांखेरीज एकही बूट जेव्हां जवळपास दिसला नाहीं—नव्हे, बूटवालीच काय, पण बिनबूटवाली देखील एकही व्यक्ति जवळ दिसली नाहीं, तेव्हां तो बराच

चकित झाला. त्यानें इकडे तिकडे पाहिलें; पण चिटपांखरूंसुद्धा नव्हतें.

"अँ?—कुठून बोलतांय् तुम्ही, राव?" त्यानें विचारलें.

उत्तर नाहीं.

पायांत नुसते पायमोजे घातलेला मार्व्हेल जागच्या जागीं उभा राहिला. त्यानें खांद्यावर टाकलेला कोट जवळ जवळ गळून पडला होता. मग तो आपल्याशीं म्हणाला, "मीं काल चुकून जास्त तर प्यालों नाहीं?"

"जास्तबिस्त कांहीं प्याला नाहींस!" आवाज म्हणतो. "पण धीर धर. घाबरायचं कारण नाहीं."

"ऊ....ऊ....ऊ...." मार्व्हेलच्या घशांतून कांपरे सूर निघूं लागले. त्याचा चेहरा एकाएकीं पांढरा फटक पडला. सुक्या ओठांवरून त्यानें जीभ फिरवली आणि डोळे फाडून तो समोर बघत राहिला.

फाडदिशीं त्याच्या मानगुटीवर कुणाची तरी पक्कड बसली. त्या 'कुणी तरी' नें त्याचें सर्वांग गदगदा हालवलें.

"ग—ग—ग—ग—ग" मार्व्हेलच्या तोंडांतून अस्फुट उद्गार निघाले. "म–म–मी त्या बुटांबद्दल ब–ब–बरळलों त्याचा परिणाम हा! भ–भ–भूतबाधा झाली मला."

"भूत नाहीं नि बाधा नाहीं" आवाज म्हणाला. "मी काय सांगतों तें ऐक नीट–मी अदृश्य माणूस आहें आणि तुम्हांला कुणालाही मी दिसत नसलों तरी मी **आहें**. तुमच्यासारखं मला खायला अन्न लागतं. रहायला जागा लागते."

* * *

# ७ पुनर्भेट

पथिकाश्रमाच्या माजघरांत आपले दोघे मित्र गुप्तपोलीस कस आणि गांवगुरु बंटिंग यांचें कांहीं संशोधन चालू होतें.

"डायरी दिसते !" तिथल्या मेजावरचीं तीन पुस्तकें उचलून ती चाळीत कस उद्गारला. "आणि—च् ! एक अक्षरही कळत नाहीं. कांहीं तरी आंकडे दिसताहेत अन् अक्षरं म्हणजे गुप्तलिपि असावी."

"आकृत्या नाहींत काढलेल्या ? या रहस्यावर प्रकाश पडेल अशीं चित्रं वगैरे नाहींत ?" बंटिंगनीं विचारलें.

"तुम्हीच बघा पाहिजे तर. हें गणित आपल्याला उलगडत नाहीं. अन् ही भाषाच असली तर रशियन आणि ही मधली मधली ग्रीक असावी. अर्थात् ग्रीक तुम्हांला कळेल म्हणा—"

"हो—हो!" मि. बंटिंग म्हणाले. त्यांनीं खिशांतून आरशी काढली आणि ती पुसली. त्यांना जरा कसेंसेंच वाटत होतें. ग्रीकच्या आपल्या अभ्यासाचा आज गंधही उरलेला आहे कीं नाहीं याची त्यांना शंका होती. "मी—मी. असं करतों. नुसत्याच चाळून बघतों या चोपड्या म्हणजे जरा कल्पना येईल. कांहीं तरी निघेल त्यांतून" ते पुटपुटले.

बोलतां बोलतां त्यांनीं आरशी चढवली. ती नीट बसवण्यांत थोडा वेळ घालवला. थोडें खाकरून खोकरून इकडे तिकडे पाहिलें. आशा ही कीं मध्येंच कांहीं तरी व्यत्यय येईल.

आणि खरोखरच एकदम व्यत्यय आला.

दरवाजा एकाएकीं उघडला.

दोघांनींही चमकून तिकडे पाहिलें. गुलाबी वर्णाचा, ठिपके ठिपके असलेला एक गुबगुबीत चेहरा त्यांना दिसला. डोक्यावर रेशमी हॅटही त्यांना दिसली. पाहुण्यांनीं केलेली चूक तेव्हांच त्यांच्या लक्षांत आली.

"ओसरींत मिळेल मद्य—इकडे नाहीं" बंटिंगनीं सांगितलें.

"आणि दार नीट लावून घ्या पक्कं" कसनें बजावलें.

"बरं—बरं—" असें म्हणून तो गृहस्थ दार लावून परत दिसेनासा झाला.

"खलाशी असावा" बंटिंगनें पुन्हा कामाकडे वळतां वळतां मत दिलें. "मोठे विचित्र असतात हे खलाशी लोक."

"कुणीही असो," कस म्हणाला, "त्याच्या त्या सताड दार उघडण्यानें मी मात्र चांगलाच दचकलों. आज काय असेल तें असो, सारखं दचकायला होतंय्—"

मि. बंटिंगनीं मृदु स्मित केलें. जणूं कांहीं ते स्वतः दचकलेच नव्हते. "हं. आतां या पुस्तकांचं पाहूं या."

"मिनिटभर थांब हं" असें म्हणून कसनें दरवाजाला आंतून कडीकुलूप लावलें आणि जागेवर येऊन बसत तो म्हणाला, "आतां नाहीं कुणी त्रास द्यायचं आपल्याला."

तो हें बोलत असतांनाच खोलींत कोणी तरी शिंकलें.

बंटिंगनीं खुर्ची ओढली आणि कसच्या शेजारीं बसत म्हटलें, "एक गोष्ट खरी—ऐपिंगमध्यें अलीकडे कांहीं फार विचित्र घडामोडी होत आहेत. अर्थात् या—या 'अदृश्य-फिदृश्य'च्या थापांवर माझा विश्वास नाहीं म्हणा—"

"विश्वास वाटण्यासारखं नाहींच तें" कस म्हणाला. "पण मी शपथेवर सांगतों कीं बाहींत अगदीं खोलपर्यंत मीं डोकावून

पाहिलं अन् बाही अगदीं पोकळ होती."

"खरं! पण—समज, आरसा बिरसा असला जवळ त्याच्या, तर ? नजरेचे चमत्कार पुष्कळ करतां येतात. ऐकलं आहेस ना तूं?"

"पुन्हा तो सगळा वाद उकरून काढूं नकोस" कस म्हणाला. "हं—हीं अक्षरं ग्रीक आहेत ना? ठीक. लाव पाहूं त्यांचा अर्थ."

पानाच्या मध्यभागीं कुठें तरी कसनें बोट ठेवलें होतें. बंटिंगनीं पुस्तक त्याच्या हातांतून घेतलें आणि आपल्या डोळ्यांपुढें धरलें. मग आणखी जरा जवळ धरलें. मग चष्मा काढून पुसला. काय होत होतें, कुणास ठाऊक; पण लेकाचीं अक्षरेंच दिसत नव्हतीं नीट. चष्मा बदलायला हवा—

एकाएकीं आपल्या मानेला मागून कुणीं तरी स्पर्श केल्याचा त्यांना भास झाला. त्यांनीं मान हलवायचा प्रयत्न केला, पण मान हलेचना. कुणाची तरी बळकट पकड मानेवर बसली होती. आपलें डोकें पुढें लोटलें जात आहे असा बंटिंगना भास झाला. थोडक्याच वेळांत त्यांची हनुवटी पार मेजाला टेकली.

भीत भीत त्यांनीं शेजारीं बसलेल्या कसकडे पाहिलें आणि त्याची तंतोतंत आपल्यासारखी अवस्था झाली आहे असें जेव्हां त्यांनीं पाहिलें त्यांच्या आश्चर्याला नि भीतीला पारावार राहिला नाहीं.

"चिमुरड्या माणसांनो!" एक आवाज अगदीं हळू बोलला. "जागचे हलूं नका. हललांत तर दोघांच्याही नरडयांचा घोट घेईन.—तुमचे असे हाल करतांना वाईट वाटतं खरं, पण इलाज नाहीं—"

हें बोलत बोलतच 'आवाज'वाल्या व्यक्तीनें कस आणि बंटिंग यांच्या हनुवट्या धाडदिशीं मेजावर आपटल्या होत्या. त्या इतक्या

जोरानें कीं त्यांच्या दांतखिळ्या खटखट वाजलेल्या स्पष्ट ऐकूं आल्या.

"माझ्या प्रश्नांचीं आतां उत्तरं द्या—एक, तुम्हीं लोकांच्या डायऱ्या वाचण्याचे धडे कधींपासून शिकलांत?—दोन, तुम्ही संकटांत सांपडलेल्या माणसांच्या खाजगी खोल्यांत घुसायचे उद्योग कधींपासून शिकलांत?—तीन, माझे कपडे कुठें ठेवलेत तुम्हीं?



"एक गोष्ट लक्षांत ठेवा. मी लेचापेचा माणूस नाहीं. भरपूर ताकद माझ्या अंगांत आहे. शिवाय ही बघा लोखंडी सळई माझ्या हातांत आहे!—" या ठिकाणीं नुसतीच सळई खालींवर झाली.

"मी या खोलींत आलों त्या वेळीं आंत कुणी असेल अशी मला कल्पनाही नव्हती. माझे कपडेही इथून कुणीं लंबे केले असतील अशी पण माझी कल्पना नव्हती. कुठें आहेत माझे कपडे? अंहं! उठायचं कारण नाहीं. हे दिवस उकाड्याचे आहेत खरे, पण संध्याकाळ झाली कीं चांगलाच गारवा असतो. तुम्हांला काय त्याची कल्पना? अदृश्य माणसाचीं दुःखं आहेत हीं! —कपडे, कपडे! कपडे पाहिजेत. कपड्यांशिवाय मला जगणं अशक्य आहे. आणि तीं पुस्तकं पण पाहिजेत मला."

* * *

# ८ अदृश्य माणूस पिसाळला

माजघरांत चाललेल्या या घडामोडीचा सुगावा बाहेर लागला नसेल अशी कोणाची समजूत असली तर ती चूक आहे. आंतली खसफस बाहेरच्या कानांपर्यंत पोचली होती. हॉल पतिपत्नी आणि टेडी हेन्फ्रे दरवाजाला कान लावूनच उभे होते. आंतली बाचाबाची नि शब्दाशब्दी त्यांना अस्फुटपणें ऐकूं येत होती.

हॉलबाई मध्येंच म्हणाल्या, "मला वाटतं, माजघराची खिडकी उघडल्याचा आवाज झाला आत्तां."

आणि बाईंनीं असें म्हणून थोडे क्षण लोटताहेत तोंच रस्त्याच्या पलीकडल्या तंबाखूच्या दुकानाचा मालक हक्स्टर "चोर—चोर! पकडा—पकडा!" म्हणून ओरडत आंगणांतून धावतांना दिसला. चोर कोण, कुठें गेला असावा हें आधीं या मंडळीच्या मुळींच ध्यानांत आलें नाहीं. त्यांनीं झपाट्यानें बाहेर धाव घेतली. ओसरींतले तमाम मद्यपी उठून उभे राहिले आणि त्यांचीही धावपळ सुरू झाली.

हक्स्टरनें चोराचा पाठलाग फार वेळ केला नाहीं. मध्येंच त्यानें एक जबरदस्त कोलांटी उडी भर रस्त्यांत घेतली आणि त्याचें कर्तृत्व तिथेंच संपलें.

हॉल आणि त्याचे दोघे जोडीदार धावत पळत वळणापर्यंत पोचले. तिथें त्यांनीं मार्व्हेलला वळून सटकतांना पाहिलें. त्यांची कल्पना अशी झाली कीं हाच तो अदृश्य माणूस एकदम दृश्य झाला असावा. लगेच एका क्षणाचाही विसांवा न घेतां त्याच्या मागोमाग या तिघांनीं धाव मारली. पण ते फार दूर गेले

नाहींत तोंच हॉल भयचकित होऊन ओरडला आणि एक उंच उडी मारून जो आपटला तो आपल्या एका जोडीदाराच्या अंगावर. दुसऱ्या जोडीदाराला वाटलें, हे दोघे एकमेकाला अडखळून पडले. म्हणून जास्त न थांबतां त्यानें चोराचा पाठलाग चालू ठेवला. पण चार पावलें जातो तों त्याचीही तंगडी ओढली जाऊन तोही ओरडत विवळत भुईसपाट झाला. पहिला जोडीदार तेवढ्यांत उठायला पहात होता; पण बैलालाही चीत करील असा एक प्रचंड रट्टा त्याच्या पाठींत बसला आणि त्यानेंही जमिनीवर लोटांगण घातलें.

हा प्रकार होईतों गल्लींत गर्दी जमूं लागली. त्यांत आघाडीवर आलेले दोघे तिघे वीर असेच जमीनदोस्त झाले. बाकीचे गोंधळले, घाबरले, इकडे तिकडे बघायला लागले.

हॉलबाई मोठी पोक्त, अवधानी. तिनें चित्त शांत ठेवून या धावपळींत भाग घेतला नव्हता. बाई पानगृहांतच उभ्या होत्या आणि एकंदर प्रकाराचें समालोचन करीत होत्या. थोड्या वेळानें माजघराचें दार उघडलें आणि कस बाहेर आला. "कुठें आहे तो?—पकडा त्याला! पकडा त्याला!" तो ओरडत सुटला आणि त्यानेंही रस्त्यावर धूम ठोकली. "पकडा त्याला—पकडा त्याला! त्याच्या हातांतल्या गठ्ठयावर नजर ठेवा! तो गठ्ठा त्याला टाकूं देऊं नका, नाहीं तर लेकाचा पुरताच अदृश्य होईल!" असें आरडत ओरडत कस धावत होता.

कस भयंकर संतापलेला दिसत होता. पण त्याच्या चेहऱ्यापेक्षांही जास्त चलबिचल त्याच्या पोशाखांत दिसत होती. फक्त एक पांढरी चादर त्यानें पांघरली होती. आणि चादरीखालून त्याचे उघडे पाय स्पष्ट दिसत होते. "पकडा—पकडा!" तो

बोंबलत होता, “त्यानें माझी तुमान पळवली आहे. पकडा त्याला! बंटिंगसाहेबांचं तर गंजीफ्रॉकपासून चड्डीपर्यंत सगळं त्यानें काढून घेतलंय्—पकडा त्या बदमाषाला!”

पण डॉ. कसनें गल्ली गांठली तेव्हां तिथें फुकाचा गोंधळ माजलेला त्याला दिसला. पाठलाग केव्हांच समाप्त झालेला होता. ‘चोरा’ची नांवनिशी देखील उरलेली नव्हती. उरलें होतें फक्त शिमग्यानंतरचें कवित्व!

कस परत पथिकाश्रमाकडे आला. पायऱ्या चढत असतांना पाठीमागें कोणी तरी रागारागानें ओरडल्यासारखें त्याला वाटलें. लगोलग कोणींतरी दुसऱ्याच्या थोबाडांत मारल्याचाही आवाज झाला. रागारागानें ओरडणारी व्यक्ति म्हणजे अदृश्य माणूस हें त्यानें ओळखलें.

एक टांग मारून कस माजघरांत शिरला.

“बंटिंग, बंटिंग! तो परत आला. पळा—पळा!”

“कोण परत आला?” बंटिंगनीं चांचरत विचारलें.

गांवगुरुजी बंटिंग त्या क्षणाला खिडकीला टेकून उभे होते. एक जीर्ण पायपुसणें आणि एक ताजें वर्तमानपत्र यांत त्यांनीं आपला देह कसा तरी गुंडाळून घेतला होता.

“अरे, कोण काय विचारतोस? अदृश्य माणूस!—पळ—पळ! सगळ्यांना तो मारत सुटलाय्—पळ!”

बंटिंगला इकडे आड, तिकडे विहीर असें झालें. तडकाफडकीं त्यानें मनाचा एक निश्चय केला आणि आपला दुहेरी पंचा एका हातानें बळकटपणें सावरीत त्यानें खिडकीबाहेर उडी घेतली.

त्या विचित्र अवतारांत आपले लठ्ठ लठ्ठ पाय ढुंगणाला लावीत

गांवगुरु बंटिंग यांची स्वारी बाजारपेठेंतून धावत सुटली आहे असें अपूर्व दृश्य सर्व ऐपिंगकरांना पहायला मिळालें. पण त्या दिवशीं हसण्याच्या मनःस्थितींत कोणीच नव्हतें.



त्यानंतर अदृश्य माणसानें ज्या कृति केल्या त्यांना अर्थच नव्हता. त्यावरून तर्क एवढाच काढतां येईल, कीं त्याचें आधींच तापट असलेलें माथें भडकलें ! एरवीं पथिकाश्रमाच्या खिडक्यांचें एकूण एक तावदान फोडण्याचें त्याला काय कारण होतें ? एका गरीब विधवा बाईच्या घराची खिडकी फोडून त्या खिडकींतून म्युनिसि-पालिटीचा कंदील आंत फेकण्याचें त्याला काय कारण होतें ? सडकेवर एका ठिकाणीं तारायंत्राच्या तारा तोडलेल्या आढळल्या; तें दुष्कर्म तरी काय, त्यानेंच केलें असावें. लोक या उच्छेदामुळें इतके घाबरले कीं जो तो आपल्या घरांत कडेकोट बंदोबस्त करून दडून बसला. व्हिटमन्-डेची जत्रा उध्वस्त झाली आणि तिला स्मशानाची अवकळा आली. बाजारपेठेंत दुकानांतला माल मोडलेला, तोडलेला, अस्ताव्यस्त पसरलेला आढळला.

नंतर किती तरी वेळ ऐपिंग गांव इतकें शांत होतें कीं मुंग्यांची कुजबुजही ऐकूं आली असती. दोन तास लोटल्यानंतर कुठें लोक पुन्हा घराबाहेर पडूं लागले. पण तोंपर्यंत अदृश्य माणसानें पार काळें केलें होतें !

* * *

# ९ बिचारा खलाशी!

तें उध्वस्त ऐपिंग गांव मागें टाकून आपल्याला आतां शेजारच्या दुसऱ्या गांवीं जायला हवें. या गांवाचें नांव पोर्ट स्टो.

गांवाच्या वेशीवर एक सराई दिसते. तिथेंच आपण मुक्काम ठोकला तर?—पण थांबा. सराईच्या आंगणांतलें तें बांक पहा. कोण बरं बसला आहे त्या बांकावर?—अरे हा तर आपला मार्व्हेल!

सकाळचा दहाचा सुमार आहे, तरी मार्व्हेलनें दाढी केलेली दिसत नाहीं. त्याचे कपडेही घाणेरडे, धुळीनें माखलेले दिसतात. अगदींच दमून भागून गेलेला, चिंताग्रस्त बसला आहे तो. मध्येंच कोटाचे खिसे काय चाचपतो आहे, कावऱ्या बावऱ्या नजरेनें इकडे तिकडे काय पहातो आहे, धापा काय टाकतो आहे, गाल काय फुगवतो आहे....

बांकावर त्याच्याजवळ तीं आपल्या ओळखीचीं पुस्तकें पण आहेतच बरं का? पण आतां तीं दोरीनें व्यवस्थित बांधलेलीं दिसतात.

आणि कपड्यांचें तें गांठोडें नाहीं दिसत कुठें....

कपड्यांचें गांठोडें रात्रींच कुठें तरी टाकून देण्यांत आलें होतें. अदृश्य माणसानें आपल्या कार्यक्रमांत आयत्या वेळीं फरक केल्यामुळें असें झालें होतें.

कुत्र्याची सांखळी धरून त्याला वाटेल तसा हिंडवावा तशी अदृश्य माणसानें मार्व्हेलची धिंड काढली होती. मार्व्हेलनें खूप दादापुता केला होता. 'मी अगदीं गाढव आहें, माझा तुम्हांला कांहीं उपयोग व्हायचा नाहीं' वगैरे सांगून पाहिलें होतें, पण अदृश्य माणसानें बिलकुल दयामाया दाखवली नव्हती.

आतां या बांकड्यावर बसून मार्व्हेलला जवळजवळ एक तास लोटला होता. एक वयस्क दिसणारा खलाशी हातांत वर्तमानपत्र घेऊन सराईतून बाहेर आला आणि त्याच बांकड्याच्या दुसऱ्या टोकाजवळ बसला; तरी मार्व्हेलचें तिकडे लक्ष गेलें नाहीं.

"अहो, या वर्तमानपत्रांत पहा ना, काय चत्मकारिक बातमी दिली आहे ती" तो खलाशी एकदम उद्गारला.

"कसली?"

"अदृश्य माणसाची."

आपलीं कानशिलें तापताहेत असें मार्व्हेलला वाटलें. त्यानें हनुवटी खाजवीत म्हटलें, "म्हणतां काय?"

"अगदीं खरं आहे म्हणे. आणि पुन्हा अमेरिकेंत किंवा आफ्रिकेंत कुठें नाहीं आहे तो माणूस. इथ्थें....इंग्लंडमध्यें!"

"इंग्लंडमध्यें?"

"अहो, ससेक्स परगण्यांत, ऐपिंग गांवांत!"

"ऐपिंग?"

"ऐपिंगहून तो निघाला आणि म्हणे पोर्ट स्टोच्या दिशेनें गेला. पोर्ट स्टो म्हणजे हेंच गांव" खलाशानें बांकड्यांवर टिचकी मारीत सांगितलें.

"अदृश्य माणूस?—अन् करतोय् काय तो?"

"वाट्टेल तें करतोय्! अदृश्यच तो. त्याला काय कमी आहे हो?....पण थांबा, मी वाचून दाखवतों तुम्हांला"

आणि असें म्हणून त्यानें वर्तमानपत्रांतली ती खळबळ उडवणारी बातमी संपूर्ण वाचून दाखवली.

"बाप रे!" मार्व्हेल म्हणाला. खिशांतले पैसे किती असावेत याचा तो हातानें चाचपून अंदाज घेत होता. मध्येंच बिचकत

होता आणि इकडे तिकडे पहात होता. "फारच विलक्षण बातमी आहे ही ! अदृश्य माणूस !—असा माणूस खरोखरच असेल तर काय वाटेल तें करूं शकेल कीं ! त्याला वाटलं चांगली झकास दारू प्यावी—तर त्याला कोण अडवूं शकणार आहे ? कुठल्याही पानगृहांत शिरेल अन् पिपंच्या पिपं दारू ढोशील. मग पोळा-सारखा माजेल अन् वाटेल तसा धिंगाणा घालील. तुमच्या माझ्या अंगावर येईल. (पुन्हा पैशाचा अंदाज घेत)....चोरी करील—वाटेल तेवढी लूटमार करील! कोण काढणार शोधून त्याला? आपण जसे एखाद्या आंधळ्याला सहज फसवूं शकतों तसा तो आपल्याला फसवील. त्याचा हात कोण धरणार आहे ?—"

मार्व्हेल बोलतां बोलतां थांबला. त्यानें आजूबाजूला पाहिलें. कुठें कांहीं पावलांचा आवाज येतो काय याचा कानोसा घेतला. त्याच्या मनाचा कांहीं तरी निश्चय होत असावा असें दिसलें. त्यानें तोंडावर हात धरून हलकेच खाकरल्यासारखें केलें.

पुन्हा एकदा चाहूल घेऊन तो पुढें वाकला आणि खलाशाच्या कानाशीं कुजबुजला, "खरी गोष्ट अशी आहे, राव—या अदृश्य माणसाची मला माहिती आहे थोडी फार—खास माहिती, बरं का ?"

"म्हणतां काय ?—तुम्हांला ?"

"हो. मलाच."

"काय बोलतां, राव ?"

"मला वाटलंच तुम्हांला खरं वाटायचं नाहीं. पण—" मार्व्हेलनें अधिऱ्या आवाजांत सांगायला सुरवात केली. पण काय झालें कुणास ठाऊक! अकस्मात् त्याचा आवाज बदलला. त्याच्या मुद्रेंत एकदम फरक पडला.

"ओयू—ओयू!—" तो किंचाळला आणि खुर्चीतून उठून

ताठ उभा राहिला. त्याच्या चेहऱ्यावरून असें दिसलें कीं याला कांहीं तरी तीव्र वेदना होत असावी.

"ओय्—" तो पुन्हा ओरडला.

"काय हो झालं?" खलाशानें विचारलें.

"कांहीं नाहीं. दांतांत कळ आली एकदम" मार्व्हेलनें बतावणी केली. मग तो म्हणतो, "गेलं पाहिजे मला आतां—" आणि असें म्हणून आपलीं पुस्तकें उचलून तो बांकड्याच्या कडेला सरकूं लागला. ही हालचाल त्या खलाशाला जरा विचित्रच वाटली.

"म्हणजे काय?" तो म्हणाला, "तुम्ही त्या अदृश्य माणसाचं सांगत होता ना कांहीं?"

याला काय उत्तर द्यावें याचा मार्व्हेल विचार करतो आहे तोंच कुठून तरी आवाज आला—"थाप."

"थाप होती ती" मार्व्हेलनें लगेच ठोकून दिलें.

"थाप?" खलाशी म्हणतो. "मग या वर्तमानपत्रांत दिलं आहे तें काय?"

"थाप आहे ती. लबाड बातमीदार आहे तो. सगळा बनवाबनवीचा प्रकार आहे"

खलाशी वर्तमानपत्र हातांत घेऊन उठला आणि गांवाच्या दिशेनें चालूं लागला. पण त्याच्या कपाळावर आठ्या दिसत होत्या आणि तो आपल्याशीं म्हणत होता—

चक्क वर्तमानपत्रांत छापलं आहे अन् तरी म्हणे थाप! लोक तरी असले चमत्कारिक भेटतात...."

इतक्यांत त्याला एक मित्र भेटला आणि त्यानें दुसरीच एक चमत्कारिक गोष्ट सांगितली. ती म्हणजे कुंपणाच्या कडेकडेनें एक

नाण्यांचा पुंज अधांतरींच प्रवास करीत चाललेला त्यानें पाहिला होता. या प्रकारावर विश्वास ठेवणें मात्र खलाशाला जरा जड गेलें. पण वास्तविक हें असें एकच उदाहरण होतें असें नाहीं. आसपासच्या पंचक्रोशींत असे किती तरी प्रकार घडले होते. दुकानें, खाणावळी, पेढ्या नि बँकांमधून नाण्यांचे पुंज नि नोटांचीं बंडलें कुणीं तरी सफाईनें उडवलीं होतीं; त्या नाण्यांनीं नि नोटांनीं असाच रस्त्याच्या कडेकडेनें तुफान प्रवास केला होता आणि अखेरीस ही सगळी रोकड पोर्ट स्टो गांवीं बांकड्यावर बसलेल्या त्या खरबुज्या इसमाच्या खिशांत अंतर्धान पावली होती.

पण हें कुणालाही माहीत नव्हतें.

सुमारें दहा दिवसांनीं आमच्या खलाशीदादाच्या तें लक्षांत आलें. अदृश्य माणूस त्या वेळीं आपल्या अगदीं जवळपास असावा असाही त्यानें निष्कर्ष काढला; आणि हा विचार मनांत येतांच त्याचें कपाळ घामानें डबडबलें !

* * *

## १० डॉ. केंप खिडकीबाहेर पहातात

तिसऱ्या प्रहरची वेळ होती. बरडॉक गांवीं आपल्या माडीवर अभ्यासाच्या खोलींत बसून डॉ. केंप कांहीं तरी महत्त्वाचें काम करीत होते.

डॉ. केंप यांचा बंगला टेकडीवर होता, त्यामुळें माडीच्या खिडकींतून त्यांना गांवावर विहंगम दृष्टि फेकतां येई. त्यांची अभ्यासिका मोठी सुंदर होती. उत्तर, दक्षिण, पश्चिम अशा तिन्ही बाजूंनीं तिला खिडक्या होत्या. खोलींत पुस्तकांचीं शेल्फें बरींच

होतीं आणि तीं शास्त्रीय ग्रंथांनीं खचून भरलीं होतीं. उत्तरेकडच्या खिडकीखालीं एका मेजावर सूक्ष्मदर्शक यंत्र, कांचेच्या नळ्या, रसायनांच्या बाटल्या आणि किती तरी बारीकसारीक हत्यारें पडलेलीं होतीं. बाहेर आकाशांत अजून संधिप्रकाश चांगला होता, तरी डॉ. केंपनीं आपल्या टेबलावरचा विद्युद्दीप लावलेला होता. खिडक्यांचे पडदे बाजूला सारलेले होते. कारण खिडक्यांतून कोणी डोकावून पहाण्याची शक्यताच नव्हती.

तरुण वय, उंच सडपातळ शरीर, कुरळे केस, पांढऱ्या पडत चाललेल्या मिशा, असें डॉ. केंपचें वर्णन करतां येईल. आत्तां हा गृहस्थ ज्या कामांत मग्न झालेला होता, तें त्याला स्वतःला इतकें महत्त्वाचें वाटत होतें कीं त्याच्या जोरावर आपण रॉयल सोसायटीचे सभासद होऊं शकूं अशी त्याची खात्री होती. मध्येंच त्याची नजर खिडकीबाहेर गेली. समोरच्या टेकडीमागें सूर्यबिंब अस्ताला जाऊं लागलें होतें. त्याचा सोनेरी रंग क्षितिज व्यापूं लागला होता. डॉ. केंप एक मिनिटभर तरी तोंडांत पेन्सिल घालून सृष्टीचें हें सुवर्णसिंचन पहात असावा. मग त्याच्या दृष्टीच्या टप्प्यांत दुसरेंच कांहीं तरी आलें.

प्रकाशाच्या पार्श्वभूमीवर काळी शार दिसणारी एक लहानशी आकृति टेकाड चढून आपल्याकडेच येते आहे असें त्याला दिसलें. इसम ठेंगणा गुटगुटीत असावा. त्याच्या डोक्यावरची हॅट तिरकी झालेली होती आणि तो एवढ्या त्वरेनें धावत होता कीं त्याच्या पायांची जणूं मिचमिच चाललेली होती.

'हा आणखी एक गाढव दिसतो !' डॉ. केंप स्वतःशीं म्हणाला. 'सकाळीं असाच एक जण भेटला होता मला. म्हणे, अदृश्य माणूस येतो आहे ! या लोकांचीं माथीं फिरलीं आहेत कीं काय समजत

नाहीं. या गोष्टी फार तर तेराव्या शतकांत शोभून दिसल्या असत्या.'

तो जागचा उठला आणि खिडकीजवळ गेला. 'बराच घाईंत दिसतो,' त्यानें आपली स्वगत टीका चालू ठेवली, 'पण त्या मानानें त्याचा वेग तर फारसा दिसत नाहीं. खिशांत शिशाचे जड गोळे घालून धावावं तसं वाटतंय्—'

पण तेवढ्यांत एक खोपट आड आलें; त्यामुळें तो माणूस दिसेनासा झाला. नंतर पुन्हा दिसला; पुन्हा कशाच्या तरी आड गेला.

'गाढव आहे झालं!' अशी त्याची पुन्हा एकदा तुच्छतेनें संभावना करून केंप आपल्या कामाकडे वळला.

पण बाहेर ज्या ज्या लोकांना तो धावणारा इसम जवळून पहायला मिळाला त्यांना त्याची अशी हेटाळणी करण्याचें साहस झालें नाहीं. कारण तो माणूस घामानें इतका थबथबलेला होता आणि त्याच्या चेहऱ्यावर मूर्तिमंत भीति अशी व्यापून राहिली होती कीं पहाणाराला लगेच त्याची कींवच यावी. तो धावत असतांना त्याच्या कोटाचे खिसे फडफड उडत होते आणि एखादें पैशाचें पाकीट हालवलें कीं खणखण वाजतें तसे वाजत होतें. धावून धावून त्याला दम लागला होता आणि तोंडांतून फेस गळत होता. हा गृहस्थ असा वाघ मागें लागल्यासारखा कां धावत असावा याचें मात्र पहाणारांना कोडें पडलें होतें. त्यामुळें लोक नुसतेच कुतूहलानें चौफेर पहात होते.

थोडया वेळानें वाटेवरचा एक कुत्रा अचानक किंचाळला आणि तसाच केकटत पायांत शेपटी घालून शेजारच्या एका फाटकाकडे धावला. आणि मग हें दृश्य पहाणारी मंडळी आणखी चकित झाली. कारण त्यांच्या अगदीं जवळ 'धप्प धप्प' असा

पावलांचा आवाज ऐकूं आला. कोणी तरी धावत होतें आणि धावतां धावतां धापा टाकत होतें.

हां हां म्हणतां रस्त्यांत गोंधळ उडाला. जिकडे तिकडे आरडा-ओरडा नि धावपळ सुरू झाली. मार्व्हेल तिथें पोचायच्या आंतच तिथलें वातावरण भयग्रस्त बनलें होतें. दरवाजे धडाधड लागत होते. रस्त्यांतली गर्दी ओसरत होती.

कोणी ओरडत होते, कोणी किंचाळत होते, कोणी कुजबुजत होते; पण त्या सगळ्याचा सारांश एकच होता. एकच भयंकर बातमी वणव्यासारखी पसरली होती—

"अदृश्य माणूस आला!"

* * *

## ११ एकच गोंधळ उडाला!

टेकडीच्या पायथ्याशींच, जिथून ट्रॅमचे रूळ सुरू होत त्या ठिकाणीं 'जॉली क्रिकेटर्स' नांवाची सराई होती. या सराईंत दारूबरोबर गांवगप्पाही भरपूर झोकल्या जात. मघाच्या प्रकरणांतली दंगल सुरू झाली त्या वेळीं सराईचा मालक गप्पांतच गुंतला होता. उघडझाप करण्याच्या आडव्या फळकुटावर दोन्ही कोपरें टेकून तो एका रोगट टांगेवाल्याशीं घोड्यासंबंधीं कांहींतरी बोलत होता. सराईंतलें दुसरें गिऱ्हाईक म्हणजे राखाडी रंगाचा सूट घातलेला, काळी कुळकुळीत दाढी असलेला एक माणूस. तो केक बिस्किटें खात नि मद्याचा आस्वाद घेत बसला होता आणि मधून मधून एका निरुद्योगी हवालदाराशीं गप्पा छोटीत होता.

"अरेच्या, ही काय गडबड आहे?" टांगेवाला मध्येंच ओर-

डला; आणि त्यानें सराईच्या खिडकींत ताणून बसवलेल्या गलिच्छ पडद्यावरून बाहेर पाहिलें.

बाहेरून कोणीतरी धावत गेल्यासारखें वाटलें.

"आगबीग तर नाहीं ?" खाणावळवाला म्हणतो.

बाहेर पावलें वाजलीं; दरवाजाजवळ आलीं. कोणीतरी धावत आलें होतें. एकाएकीं दरवाजा थाडकन् उघडला आणि मार्व्हेल रडत रडत आंत घुसला. त्याची हॅट केव्हांच हद्दपार झाली होती. कोटाची कॉलर ओढल्यामुळें फाटल्यासारखी दिसत होती. तो आंत आला आणि एकदम 'घूम जाव' करून त्यानें दरवाजा लावण्याचा प्रयत्न केला. पण दरवाजा दोरीनें भिंतींतल्या खुंटीला बांधलेला होता, त्यामुळें तो मिटेना.

"आला—आला !" तो भेदरलेल्या सुरांत किंचाळला "अदृश्य माणूस आला ! मला पकडायला येतोय् तो !–धावा धावा ! मला कुणीतरी वांचवा !"

हवालदारसाहेब गरजले, "दारं बंद करा. कोण येतो आहे ? काय गडबड आहे ही ?" आणि असें म्हणून त्यांनीं पुढें होऊन दोरी सोडली आणि दरवाजा बंद केला. सर्व जण फळी करून वाटेंत उभे राहिले.

सराईच्या मालकाला एकदम आठवण झाली—

"बाप रे ! मागचा दरवाजा ..."

तो धावतच मागच्या आंगणाकडे गेला. माजघराचें दार फट्कन् लागलें आणि आंतल्या बाजूनें किल्ली फिरल्याचा आवाज आला. जिवाची भीति मार्व्हेलला सर्वांपेक्षां जास्त होती.

एका मिनिटांतच सराईवाला परत आला; तेव्हां त्याच्या हातांत एक सुरा होता.

"मागचं दार उघडं होतं" तो कांपऱ्या आवाजांत बोलला. त्याचा पुढें आलेला खालचा ओठ आणखीच खालीं लोंबत होता.

"तो घरांत शिरलाही असेल" टांगेवाला म्हणाला.

सराईवाल्यानें सांगितलें, "तो सैंपाकघरांत तरी नक्कीच नाहीं. तिथें दोन बायका आहेत. मी तिथें कोनाकोऱ्यांत सुरीनें चांचपून आलों. त्याही म्हणतात, कोणी आलेलं नाहीं म्हणून..."

तो एवढें बोलतो आहे तोंच ती आडवी झडप थाडदिशीं वर उडाली नि फट्टकन् पलीकडच्या बाजूस पडली. लगेच माजघराचें दार खाडकन् उघडलें. दुसऱ्याच क्षणीं आंत लपलेल्या मार्व्हेलनें एक आर्त किंकाळी फोडली.

क्षणाचाही विलंब न करतां सर्वजण त्याच्या मदतीला धावले. दाढीवाल्यानें तेवढ्यांत पिस्तूल काढून गोळी झाडली आणि तिनें माजघरांतल्या कपाटाचा आरसा फोडला.

सराईचा मालक आंत शिरला तेव्हां त्याला मार्व्हेल अगदीं विचित्र अवस्थेंत भिंतीजवळ गुंडाळल्यासारखा पडलेला आढळला. सैंपाकघर नि मागच्या आंगणाकडे नेणाऱ्या दरवाजावर तो लाथा झाडीत होता. तेंही दार खाडकन् उघडलें आणि मार्व्हेलची मोटकुळी उचलली जाऊन सैंपाकघरांत फेकली गेली. पुन्हा एक किंकाळी ऐकूं आली. मग भांडीं गडगडल्याचा आवाज आला.

हवालदारसाहेब आतां सर्वांना बाजूला करीत पुढें घुसले. त्यांच्या मागोमाग टांगेवाला. मार्व्हेलची मानगुटी ज्या अदृश्य हातानें गच्च पकडली होती तो हात अचानक टांगेवाल्याच्या हातांत आला. टांगेवाल्यानें तें मनगट पक्कें दाबून धरलें. तेव्हां एक जबरदस्त फटका त्याच्या गालफडांत बसला आणि तो मागच्या मागेंच कोसळला. मागचें दार उघडलें. मार्व्हेलनें

दाराआड लपण्याचा प्रयत्न केला. तेवढ्यांत पुन्हा टांगेवाल्याच्या हातांत कांहींतरी आलें.

"सांपडला....सांपडला!"

टांगेवाल्याचे विचित्र हातवारे कांहीं क्षण चालू होते. मग सराईवाल्याला तसेंच करण्याची स्फूर्ति झाली. या मारामारींत मार्व्हेलला जरा मोकळीक मिळाली आणि तो पळायला वाट शोधूं लागला. इतक्यांत अदृश्य माणूस पहिल्यानेंच किंचाळला, हवालदारानें त्याच्या पायावर पाय दिला होता. पण दुसऱ्याच क्षणीं त्यानें बदाबद ठोसे मारायला सुरवात केली. इतक्या सपाट्यानें त्याचा हात फिरत होता कीं त्याचे प्रतिस्पर्धी गांगरले. टांगेवाल्यानें एक गिरकी खाल्ली आणि पोटांत लाथ बसल्यामुळें तो कोकलत पळाला. माजघराचें दार खाडदिशीं लागलें आणि मार्व्हेलची ती पळवाट बंद झाली. सैंपाकघरांत गोंधळ माजला. जो तो कांहींतरी पकडायला बघत होता, पण हातांत कांहींच येत नव्हतें.

दाढीवाला ओरडला, "कुठें गेला तो बदमाष ?"

"बाहेर...बाहेर...." हवालदारानें मागच्या दरवाजांतून आंगणांत उडी घेतली आणि एकदम थबकून तो तिथेंच उभा राहिला.

त्याच्या डोक्याला अगदीं चाटून एक विटेचा तुकडा सूं सूं करीत गेला आणि सैंपाकघरांतल्या मेजावर मांडलेल्या कपबशांच्या त्यानें ठिकऱ्या ठिकऱ्या केल्या.

दाढीवाल्यानें चपळाईनें पिस्तूल रोखलें. ज्या दिशेनें ती वीट आली होती त्या दिशेला त्यानें सटासट पांच गोळ्या झाडल्या.

थोडा वेळ अगदीं सामसूम होती. आंगणांत आतां चांगलाच काळोख पसरला होता. दाढीवाल्यानें पिस्तूल खिशांत घालीत

म्हटलें, "कुणीतरी कंदील आणा. सगळ्याभर चांचपून त्याचं प्रेत शोधायचंय् !"

* * *

## १२ रहस्यकथन

सट्–सट्–सट्–सट्–सट् !

पिस्तुलाचे पांच बार डॉ. केंपनें मोजले. त्यानें लेखणी तोंडांत घालीत म्हटलें, "हा आणखी काय गाढवपणा आहे ?"

तो जागचा उठला, दक्षिणेकडच्या खिडकीजवळ गेला आणि त्यानें बाहेर डोकावून पाहिलें.

मिणमिण जळणाऱ्या गॅसबत्त्या, खिडक्यांच्या चौकटी, छपरांचे काळे पट्टे, आंगण, कुंपणांच्या रेघा, हें ठराविक दृश्य त्याला दिसलें. 'जॉली क्रिकेटर्स' जवळ गर्दी जमलेली पण त्यानें पाहिली. तो तसाच खिडकापाशीं उभा राहिला. आणि त्यानें आपली नजर आणखी दूरवर नेली. पलीकडे बंदरावरचा प्रकाश दिसत होता. धक्क्यापासून जरा दूर एक जहाज उभें होतें, त्याचे दिवे काजव्यांसारखे चमचमत होते. पश्चिमेकडच्या टेकाडावरून चंद्रकोर वर आली होती. स्वच्छ निळ्या आकाशांत चांदण्या लुकलुकत होत्या.

डॉ. केंपनें पांच मिनिटेंपर्यंत ही शोभा पाहिली. मग तो दुसऱ्याच कांहीं विचारांत गढून गेला. हे विचार फारच गंभीर होते. मानवसमाजांतली क्रांति, पुढें या समाजाचें होणार काय, वगैरे वगैरे.

मध्येंच डॉ. केंपनें एक दीर्घ निःश्वास सोडला, खिडकी लावून

घेतली आणि तो परत आपल्या कामाकडे वळला.

नंतर जवळ जवळ तासभर त्याचें काम चालू होतें. एकाएकीं दारावरची घंटी वाजल्यामुळें त्याचें लक्ष पुन्हा उडालें. मोलकरणीनें दार उघडल्याची चाहूल त्याला लागली. कोण आलें असावें?

पण कोणीच आलें नव्हतें. पुन्हा केंपनें लेखणी हातांत घेतली, पण त्याचें लक्ष लागेना.

तो उठला, जिन्याकडे गेला आणि कठड्यावरून वाकून त्यानें मोठ्यानें विचारलें, "पत्रबित्र आलं का आतां?"

"नाहीं साहेब!" खालून मोलकरणीनें उत्तर दिलें. "कुणीं वाजवली घंटी कुणास ठाऊक! मीं दार उघडून नीट पाहिलं. कोणीच नव्हतं."

डॉ. केंप त्रस्त चेहरा करून अभ्यासिकेकडे परतला. आतां अगदीं कांहीं व्यत्यय आला तरी कामांतून डोकें वर करायचें नाहीं असें त्यानें ठरवलें. कागद पुढें ओढले, लेखणी उचलली...

दोन वाजेपर्यंत खरोखरच केंप एकाग्र चित्तानें काम करीत होता. घड्याळाची टिक टिक आणि लेखणीची अस्पष्ट चरचर एवढेच आवाज त्या खोलींत ऐकूं येत होते.

दोन वाजतां काम पुरें झालें. केंप उठला. त्यानें एक जांभई दिली. आणि झोपायला जायचें ठरवलें. पण अंगांतला कोट काढतां काढतां त्याला असें वाटलें कीं आपला घसा फारच कोरडा झाला आहे. थोडीशी व्हिस्की घेऊन मगच झोपावें.

केंपनें एक मेणबत्ती पेटवली आणि ती नीट धरून तो खालीं व्हिस्कीच्या शोधार्थ निघाला.

डॉ. केंप खराखुरा शास्त्रज्ञ होता. सूक्ष्म निरीक्षणाची त्याला उपजतच बुद्धि होती. व्हिस्कीची बाटली नि ग्लास घेऊन परत

जिन्याकडे येतांना एका बारीकशा गोष्टीकडे त्याचें लक्ष गेलें. जिन्याच्या पायथ्याशीं जें जाजम आंथरलेलें होतें त्यावर त्याला एक काळा डाग दिसला. हातांत सामान असल्यामुळें तो तसाच कांहीं पायऱ्या चढला. पण त्याला चैन पडेना. पुन्हा तो



खालीं उतरला. बाटली नि ग्लास त्यानें पायरीवर ठेवलीं; आणि खालीं वाकून तो डाग कसला आहे हें बोटानें पाहिलें.

डाग रक्ताचा आहे एवढें कळल्यावरसुद्धा त्याला आश्चर्य वाटलें नाहीं.

पुन्हा बाटली नि ग्लास घेऊन तो माडीवर गेला. मात्र अभ्यासिकेंत शिरण्याऐवजीं जागच्याजागीं खिळून उभा राहिला.

दरवाजाची मूठ रक्तानें माखलेली दिसत होती.

त्यानें चटकन् आपल्या हातांकडे पाहिलें. त्याचे हात तर स्वच्छ होते. मग त्याला आणखी एक गोष्ट आठवली....आपण मघांशीं खालीं गेलों तेव्हां आपल्याला दार उघडावें लागलें नव्हतें, कारण तें सताड उघडेंच होतें.

डॉ. केंप सरळ आपल्या खोलींत शिरला. त्याची मुद्रा अगदीं शांत—नेहमींपेक्षां जरा जास्तच निश्चयी दिसत होती. खोलींत त्यानें सगळीकडून चौकस नजर फिरवली. आरशाचें टेबल, वॉश-स्टँड, पलंग....

पलंगावर त्याला जरा विचित्र देखावा दिसला. चादर विसकटलेली, इतकेंच नाहीं तर टरकावलेली दिसली. तिला रक्ताचे ठिकठिकाणीं डाग पडले होते. पलंगाच्या एका टोकाकडे बिछान्याला विचित्र खोलगटपणा आला होता. जणूं कांहीं नुकतेंच कुणी तरी तिथें बसलें होतें आणि आतांच उठून गेलें असावें !

इतक्यांत त्याला असा भास झाला कीं खोलींत कुणी तरी हलक्या आवजांत उद्‌गारलें, 'बाप रे ! डॉ. केंप !'

चांगलाच चपापून डॉ. केंप मागें हटला. त्याचा चेहरा पांढरा फटक पडला होता.

"भिऊं नकोस. अगदीं भिऊं नकोस !" आवाज म्हणाला. "तूं भ्यालास कीं सगळं गेलं. मला तुझी मदत हवी आहे."

बोलतां बोलतां अदृश्य हातांनीं केंपचा दंड पकडला, गच्च आवळला. केंपनें स्वतःला सोडवून घ्यायचा प्रयत्न केला तेव्हां त्याच्या खांद्याला धरून अदृश्य माणसानें त्याला पलंगाकडे नेलें आणि त्याला बिछान्यावर आपटलें. केंपनें ओरडण्यासाठीं तोंड उघडलें, तेव्हां चादरीचा बोळा पटकन् त्याच्या तोंडांत घुसला.

"शहाण्यासारखं वागणार आहेस का तूं ?" अदृश्य माणूस म्हणाला. "कबूल करत असशील तर बोळा काढतों. जर का कोकलायला तोंड उघडलंस तर थोबाड फोडीन तुझं."

केंपनें थोडी धडपड केली; मग तो गप्प बसला. अदृश्य हातांनीं त्याच्या तोंडांतला चादरीचा बोळा काढला.

"आतां मी सांगतों तें नीट ऐक—मी अदृश्य माणूस आहें· ही थापबीप नाहीं. खरी गोष्ट आहे. तसंच यांत जादूटोणा पण नाहीं. मी खराखुरा न दिसणारा माणूस आहें. मला तुझी मदत हवी आहे. तुझ्या केसालाही मी धक्का लावणार नाहीं. पण तूं जर वेडगळपणा केलास तर तुला मी होता नव्हतासा करीन! पहिल्यानें सांग, माझी ओळख तुला पटली का ? मी ग्रिफिन. युनिव्हार्सिटी कॉलेजचा ग्रिफिन."

"ग्रिफिन ?" केंपनें मान चोळीत विचारलें.

"केमिस्ट्री घेतली होती मीं! तुझ्यापेक्षां वयानें लहान, पण उंचीला सहा फूट, धिप्पाड, तगडा. चेहरा गुलाबी होता, डोळे तांबडे होते...."

"माझ्या मनाचा गोंधळ उडाला आहे. ग्रिफिन माहीत आहे मला. पण त्याचा काय यांत संबंध?"

"अरे, मी स्वतःच ग्रिफिन!"

केंप जरा वेळ विचारमग्न झाला. मग म्हणतो, "छे! भयंकरच हें सगळं! पण ही भुताटकी झाली तरी कशी?"

"सांगितलं ना तुला, ही भुताटकी वगैरे नाहीं! हा शास्त्रसिद्ध प्रयोग आहे."

"भयंकर!"

"भयंकर तर खराच. पण तें राहूं दे. मी अतिशय दमलों आहें. मला जखम झालेली आहे; ती दुखते आहे.—केंप! केंप! असं काय करतोस? जरा शहाणपणानें वाग. तूं जर मला मदत केली नाहींस तर माझं कसं होईल ?—मला—मला खायला दे कांहीं तरी. प्यायला दे. मला बसूं दे जरा इथें."

अदृश्य माणूस बोलत असतांना ती मलमपट्टी खोलीभर फिरत

होती. केंप तिच्याकडे टकटक पहात राहिला. मग एक खुर्ची पुढें ओढली गेली आणि पलंगाच्या अगदीं जवळ ठेवली गेली. —कर्र् आवाज झाला. खुर्चींतल्या गादीला खोलगटपणा आला!

केंपनें डोळे चोळले.

"हें—हें भलतंच आहे! भुताटकीवर ताण केलीस तूं!" तो मोठ्यानें हसून म्हणाला.

"हं, असा बोल जरा. आतां पहिल्यानें मला व्हिस्की पाज थोडी."

"देतों. ही घे—पण आहेस कुठें तूं?" केंप असें म्हणतो आहे तोंच व्हिस्कीचा ग्लास हिसकावला गेला. खुर्चीपासून तीन फूट उंचीवर अधांतरींच तो एकदम कलता झाला आणि त्यांतलें पेय अधांतरींच सांडलें. एक चिमुकला ओहोळच तयार झाला—पण हवेंतल्या हवेंत! त्याला आधार मुळींच नव्हता. खुर्चीच्या बैठकी-पासून सुमारें वीस इंच उंचीवर हा ओहोळ थांबला आणि त्याचें एक थारोळें तयार झालें—तेंही अधांतरींच.

केंप बुचकळ्यांत पडला. तो म्हणाला, "हा नजरबंदीचा तर प्रकार नाहीं?"

"नाहीं, नाहीं, नाहीं!—कितीदा सांगूं तुला? हें सगळं खरं आहे."

"खरं आहे?" केंप हट्टानें म्हणतो, "शक्यच नाहीं खरं असणं. आज सकाळींच मीं गणित मांडून सिद्ध केलं कीं अदृश्यपणा ही अशक्य गोष्ट आहे."

"तूं काय सिद्ध केलं असशील तें खड्डयांत गेलं!" आवाज उद्धटपणें म्हणतो. "माझ्याजवळ कपडे नाहींत. मी थंडीनें गारठलों आहें. एखादं ड्रेसिंग गाऊन तरी देतोस?"

केंपनें कांहीं तरी पुटपुट केली. पण तो उठला आणि आपलें कपड्याचें कपाट उघडून त्यानें एक तांबडें लाल ड्रेसिंग गाऊन काढलें.

"चालेल ?"

अदृश्य माणसानें उत्तर न देतां तें हिसकावून घेतलें. क्षणभर तें हवेंत लटकत राहिलें, मग त्यानें जरा फडफड केली आणि मग ताठ उभें केल्यासारखें तें खुर्चींत बसलें. त्याचीं बटनें आपो-आप लागूं लागलीं.

"आतां पाटलोण, पायमोजे, सपाता—!" अदृश्य माणसाच्या मागण्या सुरू झाल्या. "थंडीनें कुडकुडतों आहें मी—अन् खायला पण दे."

"देतों बाबा, सगळं कांहीं देतों. पण असला चमत्कारिक पिसाट प्रकार मीं जन्मांत पाहिला नव्हता !"

लवकरच त्यानें आपल्या पाहुण्याला पुरेसे कपडे दिले. खालीं जाऊन सैंपाकघरांतून त्यानें कांहीं शिळेपाके पदार्थ आणले आणि एका लहान मेजावर ते पाहुण्यासाठीं मांडले.

"थांब—कांटे, चमचे—"

"कांटे नकोत अन् चमचे नकोत !" विचित्र पाहुण्यानें खाद्य-पदार्थांवर झडप घालीत म्हटलें, "बैस तूं आतां."

केंप अजूनही संशयग्रस्त स्थितींत होता. डोकें नसलेली, हात नसलेली, ड्रेसिंग गाऊनमधली ती अमानुष आकृति बकाबका खात होती. त्याला तें कसेंसेंच वाटत होतें.

अदृश्य पाहुण्यानें यथेच्छ भोजन केलें. नंतर एक चिरूट मागून घेतला. चिरुटाचें टोक तोडण्यासाठीं केंप चाकू शोधतो आहे तोंच त्यानें दांतांनीं चावून तें थुंकून टाकलें; आणि काडी

ओढून चिरूट शिलगावलासुद्धा.

तेंही दृश्य केंपला मोठें अजब वाटलें. ड्रेसिंग गाऊनच्या कॉलरीपासून वर तीन चार इंचांच्या अंतरावर एखाद्या यमपुरींतल्या बाहुल्यासारखा चिरूट नाचत होता. ड्रेसिंग गाऊनची पोकळ बाही त्याला जणूं तालावर नाचवीत होती.

विचित्र पाहुण्यानें चिरुटाचे हावरटपणानें भराभर झुरके घेतले. बराच वेळ तो एक अक्षरही बोलला नाहीं. धूम्रपानाच्या सुखांत तो अगदीं मशगुल झाला होता !

थोड्याच वेळानें त्यानें बोलायला सुरवात केली. पण तें बोलणें तरी कसें ? तुरळक मोडकीं तोडकीं वाक्यें, संदिग्ध माहिती—कशाबद्दल ? नुकत्याच झालेल्या मारामारीबद्दल, मार्व्हेल-बद्दल, आपण दिलेले पैसे त्यानें कसे स्वाहा केले त्याबद्दल....

"कुठून मिळवलेस तूं ते पैसे ?" केंपनें एकदम विचारलें.

"तें मी तुला आत्तां सांगणार नाहीं—अयाई ग !" अदृश्य पाहुणा मध्येंच कळवळला. आणि खुर्चीत पुढें वाकून त्यानें आपल्या अदृश्य हातांनीं आपलें अदृश्य डोकें दाबून धरलें.

"केंप....केंप ! मला झोप मिळालेली नाहीं—अजिबात झोप मिळालेली नाहीं !" तो कण्हत म्हणाला.

"मग झोप कीं इथें—माझ्या खोलींत."

"आणि मी झोपलों नि तो पळून गेला तर ?"

"तो ?"

"मार्व्हेल रे ! तो दुष्ट विश्वासघातकी मार्व्हेल ! पण जाऊं दे. झोप तर घेतली पाहिजे !"

"मग झोप सांगतों ना ?"

अदृश्य माणूस केंपकडे टक लावून पहात होता—निदान

पहात असावा. त्यानें एकदम म्हटलें, "पण झोपेंत कुणी दगा-फटका केला तर? आजकाल कुणाचाही भरवसा देतां येत नाहीं!"

केंप चपापला.

अदृश्य माणसानें धाडदिशीं आपली अदृश्य मूठ टेबलावर आपटली आणि तो त्रस्तपणें पुटपुटला, "काय गाढव आहें मी! हें बोललोंच नसतों तर? भलत्या कल्पना मींच या माणसाच्या डोक्यांत भरवल्या!"

* * *

## १३ रहस्यकथन : पुढें चालू

अदृश्य पाहुणा डॉ. केंपच्या नुसत्या शब्दावर विसंबून राहिला नाहीं. तो पूर्णपणें थकून गळून गेला होता, त्याची जखम ठणकत होती, तरीसुद्धा झोपण्यापूर्वी त्यानें आपल्या खोलीची बारीक तपासणी केली. अभ्यासिकेला लागून असलेली लहानशी खोलीही तपासली. दोन्ही खिडक्यांचे पडदे सारून बाहेर डोकावून पाहिलें. तितकीच पाळी आली तर बाहेरच्या ड्रेनेज पाइपला धरून पळ काढतां येईल असें केंपनें त्याला सांगितलें होतें; त्याबद्दल त्यानें खात्री करून घेतली. बाहेर निःस्तब्ध आणि शांत होतें, आणि टेकडीच्या मागें चंद्रकोर अस्ताला चालली होती.

खोलीला आंगचें कुलूप होतें आणि आंतल्या बाजूला किल्ल्या अडकवलेल्या होत्या. तें सर्व त्यानें नीट तपासलें. शेवटीं एकदाचें त्याचें समाधान झालें.

"माफ कर!" ड्रेसिंग गाऊनमधली ती आकृति म्हणाली. "मी

इतका दमलों आहें कीं आज तरी तुला सगळं समजावून सांगणं मला अशक्य आहे. उद्यां आपण बोलूं. केंप, आत्तां जर मला झोप मिळाली नाहीं तर मी मरेन !"

ड्रेसिंग गाऊनची बाही वर उचलली गेली. केंपचा उजवा हात दाबून विचित्र पाहुणा म्हणाला, "गुड नाईट !"

"गुड नाइट."

डॉ. केंप जराशा मूढावस्थेंतच बाहेर पडला. खोलींत कुल-पाची चावी फिरल्याचा आवाज झाला.

केंपनें कपाळाला हात लावला.

"हें सगळं स्वप्न तर नाहीं? मला वेडबीड तर लागलेलं नाहीं?—माझ्याच खोलींतून मी हाकलला जातों. आणि कुणा-कडून? तर एका भुताकडून! भूतच नाहीं तर काय? अदृश्य माणूस हा प्रकार कुणाला खरा तरी वाटेल?"

पण जिन्यापाशीं गेल्यावर तो थांबला आणि आपल्या बंद खोलीकडे पाहून मोठ्यानें म्हणाला, "पण तो खरा आहे, यांत मुळींच शंका नाहीं ! पण—पण...."

त्यानें हताशपणें मान हलवली. तो वळला, जिन्याच्या पायऱ्या उतरूं लागला.

खालीं जेवणघरांत गेल्यावर त्यानें दिवा लावला, एक चिरूट पेटवला आणि त्याचे झुरके घेत तो खोलींत येरझारा घालूं लागला. दरम्यान स्वतःशीं त्याचें 'संभाषण' चालू होतें—

'अदृश्य!'

'मग काय झालं? दुसरे नसतात लाखों अदृश्य प्राणी? बारीक बारीक सूक्ष्म जंतु?'

'पण ते सूक्ष्म असतात!'

'जेली फिश? तो पाण्यासारखाच पारदर्शक मासा? दुसरे हजारों, लाखों पारदर्शक जंतु?'

'पण ते पाण्यांत असतात. जमिनीवर—हवेंत? तें अशक्यच आहे!'.

'पण अशक्य कां?'

'अशक्यच. माणूस जरी कांचेचा असता, तरी दिसल्याशिवाय राहिला नसताच.'

या मानसिक संवादानें त्याचें माथें फिरलें. खोलींतल्या जाजमावर चिरुटाच्या राखेचा सडा पडला.

मध्येंच पलीकडच्या खोलींत जाऊन डॉ. केंपनें त्या दिवशींचें वर्तमानपत्र आणलें. ऐपिंगच्या पथिकाश्रमांत उडालेल्या धामधुमीचें समग्र वर्णन त्यांत होतें. तें आतां केंपनें विशेष काळजीपूर्वक वाचून काढलें. ऐपिंगच्या रस्त्यांतून 'अदृश्य माणसा'नें एका खरबुज्या इसमाचा पाठलाग करून सर्वांना कसें घाबरवून सोडलें ती सगळी हकीकत त्यांत होती; आणि ती सर्व देऊन एकंदर प्रकार बनवाबनवीचा दिसतो असें संपादकांनीं आपलें मतही त्यांत ठोकून दिलें होतें.

'बनवाबनवी?' केंप म्हणाला. 'पण—पण त्या खरबुज्या इसमाचा पाठलाग तर त्यानें केलाच ना? अगदीं बरडॉकपर्यंत आली ती धिंडका!—म्हणजे हा प्राणी नुसताच अदृश्य नाहीं, तो माथेफिरू आहे! वेड लागलेला पिसाट इसम आहे! तो कोण्या वेळीं काय करील याचा नेम नाहीं!'

पहाट झाली तरी केंपच्या येरझारा चालूच होत्या. जेवणघरांतलें वातावरण धूम्रमय बनलें होतें.

डॉ. केंपच्या नोकरांनीं पाहिलें तर आपल्या धनीसाहेबांचा चेहरा ओढलेला, फिकट दिसतो आहे. त्यांनीं रात्रीं काम फार केलें असावें एवढाच कयास त्यांनीं बांधला. 'दोघांपुरता चहा नि टोस्ट तयार करून वर अभ्यासाच्या खोलीजवळच्या छोट्या खोलींत ठेवा आणि मग तुम्ही कुणी वर येऊं नका' हा मालकाचा हुकूम मात्र त्यांना चमत्कारिक वाटला. पण कुणालाही कांहीं प्रश्न विचारण्याचें धाडस झालें नाहीं.

सकाळीं डॉ. केंपनें गांवांत मिळालीं तेवढीं ताजीं वर्तमानपत्रें मागवून आणलीं आणि समग्र वाचून काढलीं.

डॉ. केंप जसजसा वाचीत गेला तसतशी त्याच्या मनांतली खळबळ वाढत चालली.

'अदृश्य माणूस ही एक सिद्ध नि सत्य कथा आहे' तो जोरानें म्हणाला. 'वर्तमानपत्रांनाही आतां तें पटायला लागलं आहे, पण—पण—हा अदृश्य माणूस म्हणजे एक भयंकर प्राणी दिसतो! तो त्या खरबुज्या इसमावर संतापलेला आहे. त्याच्यावरच कां, सर्वांवरच तो संतापलेला आहे. त्याचं डोकं मुळीं ताळ्यावरच नाहीं!...'

'माथेफिरू अदृश्य माणूस!'

'काय करावं मी आतां? असं केलं तर ती दगलबाजी होईल का?

'मला नाहीं वाटत!....'

कोपऱ्यांत एक छोटें मेज होतें. त्याच्यावर पडलेल्या कागदां-तला एक तुकडा घेऊन डॉ. केंप भराभर कांहींतरी लिहूं लागला. मग मध्येंच त्यानें ती चिठ्ठी वाचली आणि फाडून टाकली.

दुसरी लिहिली. वाचून पाहिली. एका पाकिटांत घातली. वर पत्ता लिहिला—"कर्नल आडिये, पोर्ट बरडॉक."

इतक्यांत माडीवरच्या खोलींत दाणदाण पात्रें वाजल्याचा आवाज झाला. एक खुर्ची धाडदिशीं पडली. एक ग्लास खळकन् फुटला.

अदृश्य पाहुणा उठल्यापासूनच संतापलेला आहे हें डॉ. केंपनें ओळखलें.

तो धावत वर गेला आणि त्यानें दरवाजावर टक टक केलें.

"काय झालं ?" अदृश्य हातांनीं दार उघडतांच केंपनें पहिला प्रश्न केला.

"कांहीं नाहीं. डोकं भडकलं" अदृश्य माणसानें थोडक्यांत उत्तर दिलें. "जखम झालीय् हें विसरून गेलों. अयाई ग ! फार कळा निघताहेत ! सुजलाय् हात."

"नेहमींच भडकायची संवय आहे काय तुला ?" केंपनें विचारलें.

"कधीं कधीं लहर येते."

"अस्सं."

केंपनें खोलींत पडलेला फुटका ग्लास उचलला. तो म्हणाला, "तुझ्याबद्दलची सगळी हकीकत वर्तमानपत्रांत छापून आली आहे. ऐपिंगमध्यें काय घडलं, नंतर तूं कुठून पळालास, बरडॉकच्या सराईत काय झालं, सगळं सगळं ! फक्त तूं इथें माझ्याकडे आहेस हें कुणाला माहीत नाहीं."

अदृश्य माणसानें एक शिवी हासडली.

"तुझं रहस्य फुटलेलं आहे. तुझ्यापुढें काय बेत आहे हें मला ठाऊक नाहीं. पण मी तुला शक्य ती मदत करीन. पहिल्यानें आपण चहा घेऊं या."

शेजारच्या खोलींत चहाची तयारी केलेली दिसली. केंप आणि त्याचा विचित्र पाहुणा यांनीं मनसोक्त चहाफराळ केला नंतर रुमालानें तोंड पुसून पाहुणा म्हणतो, "माझी हकीकत ऐकायची आहे ना तुला? ऐक—

"युनिव्हर्सिटी कॉलेजमधून पास झाल्यावर मीं लंडन सोडलं. वैद्यकीचा अभ्यास मीं सोडून दिला अन् फिजिक्सकडे वळलों. मला विशेष आकर्षण होतं तें 'प्रकाश' या विषयाचं."



"हं—अंधार या विषयाचं म्हण!"

"केंप, प्रकाशाची घनता हा मोठा गमतीचा विषय आहे. एका ठिकाणीं प्रकाशाचा रंग एक असतो, दुसरीकडे वेगळाच

असतो. कुठें प्रकाश दाट असतो, कुठें पातळ असतो. या सर्व गोष्टींचं शास्त्र म्हणजे चक्रव्यूहाच्या कोड्यासारखं आहे. पण त्यांत मधूनच पळवाटा असतात, त्या आपल्या आपण हुडकून काढल्या पाहिजेत. त्यांतच फसायला होतं. पण नेमकी योग्य वाट सांपडली कीं इच्छित स्थळ गांठणं मुळींच कठीण नाहीं.

"मी त्या वेळीं बावीस वर्षांचा तरुण होतों. मोठ्या धडाडीनें मीं या कामाला वाहून घेतलं. सहा महिनेपर्यंत मीं चिकट डोंगळ्यासारखा हेंच काम करत होतों. नंतर एक दिवस माझ्या चिकाटीचं चीज झालं. सभोवतालीं जो दाट काळोख होता त्यांत एकदम प्रकाशकिरण चमकला. दृश्यादृश्यतेचं कोडं मला सुटलं!"

"तें कसं?"

"सांगतों. एखादी वस्तु **दृश्य असते** किंवा **दिसते** याचा अर्थ काय? त्या वस्तूवर प्रकाशकिरण पडले म्हणजे त्यांचा कांहीं विशिष्ट परिणाम होतो आणि म्हणून ती वस्तु दृश्यमान होते. **जर प्रकाशाचा तसा परिणाम झाला नाहीं तर ती वस्तु मुळीं दिसायचीच नाहीं!**

"आणखी बाळबोध भाषेंत तुला सांगतों....केंप, तुला हें तर माहीतच आहे कीं पदार्थ एकतर प्रकाशाला शोषून घेतो किंवा परत फेकतो. प्रकाश जर आपल्या दिशेनें सरळ परत गेला तर आपल्याला प्रतिबिंब मिळतं आणि आपण म्हणतों, प्रकाशाचं परावर्तन झालं. पण परत येतांना जर प्रकाशानें दिशा बदलली तर आपण म्हणतों प्रकाशाचं वक्रीभवन झालं. अशा रीतीनें प्रत्येक पदार्थ प्रकाशाचं शोषण तरी करतों किंवा परावर्तन अगर वक्रीकरण तरी करतो. जर यापैकीं कोणतीही प्रतिक्रिया त्या पदार्थाकडून घडली नाहीं, तर तो पदार्थ दृश्य न होतां अदृश्य राहील.

“ एखादं तांबड्या रंगाचं लाकडी खोकं घे. तें आपल्याला दिसतं —म्हणजे काय होतं ? प्रकाशकिरणांतले वेगवेगळे रंग त्या खोक्याकडून शोषले जातात. फक्त तांबडा रंग तेवढा खोक्याकडून परावर्तित होतो. कारण खोक्याचाही रंग तांबडाच असतो. सम-समान रंगांचं एकमेकांशीं सूत जमत नाहीं !

“ पण समज, प्रकाशकिरणांपैकीं कोणताही रंग न शोषणारा पदार्थ असेल तर ? मग किरणांतले सर्वच्या सर्व रंग त्या पदार्था-कडून परावर्तित होतील. उदाहरणार्थ, चकचकीत चांदीची पेटीच घे. हिऱ्याची बनवलेली डबी असेल तर ती मात्र प्रकाशाचें विशेष शोषणही करणार नाहीं किंवा परावर्तनही करणार नाहीं. डबीवर जिथें जिथें अनुकूल पृष्ठभाग सांपडेल तिथून प्रकाश अंशतः परावर्तित होईल आणि अंशतः वक्रीभूत होईल. त्यामुळें डबी मधूनच लकलक करतांना किंवा चकाकतांना दिसेल. तीच डबी कांचेची असेल तर ? मग ती एवढी चकाकणार नाहीं. हिऱ्याच्या डबीएवढी ती स्पष्ट **दिसणार** नाहीं. याचं कारण कांचेची डबी प्रकाशाचं फारसं परावर्तन किंवा वक्रीकरण करणार नाहीं. आलं ना तुझ्या लक्षांत ? कांहीं विशिष्ट ठिकाणीं उभं राहिल्यावर तर कांचेच्या डबींतून आपल्याला पलीकडचं स्पष्ट दिसूं शकतं. कांचा-देखील निरनिराळ्या प्रकारच्या असतात. खिडकीच्या तावदानाची साधी कांच घे. अशा कांचेची पेटी जितकी चकचकीत दिसेल त्यापेक्षां गारगोटीच्या कांचेची पेटी जास्त चकचकीत दिसते. साधी पातळ कांच अंधुक प्रकाशांत दिसायचीसुद्धा नाहीं; कारण ती प्रकाशाचं शोषण जवळ जवळ मुळींच करूं शकणार नाहीं आणि परावर्तन किंवा वक्रीकरण तर त्याहून नाहीं. साध्या पांढऱ्या कांचेचा तुकडा पाण्यांत टाकून पहा किंवा

पाण्याहून जास्त घट्ट अशा एखाद्या द्रवांत टाकून पहा,....ती अदृश्यच होईल असं म्हटलं तरी चालेल. कां? कारण पाण्यांतून कांचेंत शिरणाऱ्या प्रकाशकिरणांचं परावर्तन किंवा वक्रीभवन फारच थोड्या प्रमाणांत होतं. ज्या कारणासाठीं हवेंतला हैड्रोजन किंवा कार्बन आपल्याला दिसूं शकत नाहीं त्याच कारणासाठीं पाण्यांतली कांच दिसूं शकत नाहीं."

"तें माहीत आहे. शाळेंतला मुलगासुद्धा हें सांगूं शकेल."

"होय. आणि केंप, शाळेंतला मुलगा तुला आणखीसुद्धा कांहीं सांगूं शकेल. कांचेचा तुकडा फोडला, त्याची भुकटी केली तर हवेंत ती पूर्वींपेक्षां जास्त दृश्यमान होते. जी कांच पारदर्शक होती ती आतां जवळ जवळ अपारदर्शक बनते. कां? कारण बारीक कण केल्यावर कांचेच्या पृष्ठभागांची संख्या साहाजिकच वाढते. प्रकाशाचं जिथून परावर्तन किंवा वक्रीभवन होणार अशा संभाव्य जागा वाढतात. कांचेचा एकच मोठा तुकडा होता तेव्हां त्याला फक्त दोन पृष्ठभाग होते. कांचेचे बारीक बारीक कण झाल्याबरोबर त्या प्रत्येक कणावरून प्रकाश परावर्तित वा वक्रीभूत झाला. बहुतेक प्रकाश अशा रीतीनें परत फेकला गेला, आणि फारच थोडा कांचेंतून पलीकडे गेला. कांचेची दृश्यता वाढली अदृश्यता कमी झाली. पण हीच कांचेची भुकटी जर पाण्यांत सोडली तर ती दिसेनाशी होईल. कां? कारण **कांचेच्या कणांची वक्रीकरणशक्ति आणि पाण्याची वक्रीकरणशक्ति आतां समसमान झाली.** पाण्यांतून जातांना ज्याप्रमाणें प्रकाशाचं वक्रीकरण अगदींच थोडं होतं, त्याप्रमाणें कांचेच्या भुकटींतून जातांनाही प्रकाशाचं वक्रीकरण अगदींच थोडं होतं. म्हणजे पाण्यांत कांच अदृश्य करण्यासाठीं पाण्याच्या वक्रीकरणशक्ती-

इतकी कांचेचीही वक्रीकरणशक्ति कमी करावी लागली. हाच युक्तिवाद पुढें चालव, म्हणजे केंप, तुला असं कळून येईल कीं कांचेची वक्रीकरणशक्ति जर आणखी कमी केली...हवेच्या वक्री-करणशक्तीइतकी कमी केली—तर हवेंत देखील कांच अदृश्य होऊं शकेल! कारण मग प्रकाश कांचेंतून पलीकडल्या हवेंत जातांना यत्किंचित् परावर्तितही होणार नाहीं किंवा वक्रीभूतही होणार नाहीं."

"खरं, खरं" केंप म्हणाला. "पण माणूस म्हणजे कांहीं कांचेची भुकटी नाहीं."

"नाहीं" ग्रिफिननें उत्तर केलें. "माणूस कांचेची भुकटी नाहीं. पण तो कांचेहून जास्त पारदर्शक आहे."

"छट् !"

"हें छट् करणारा माणूस डॉक्टर असावा ही किती केविलवाणी गोष्ट आहे! एवढ्यांतच तूं आपली विद्या विसरलास, केंप? पदार्थ-विज्ञान तुझा विषय, होय ना? मग—किती तरी पदार्थ असे आहेत कीं जे वास्तविक **पारदर्शक आहेत** पण तसे **भासत नाहींत**, हें तुला माहीत नाहीं? उदाहरणार्थ कागद. पारदर्शक तंतूंपासून कागद बनलेला आहे. ज्या कारणासाठीं कांचेचे कण पांढरे नि अपारदर्शक बनले त्याच कारणासाठीं कागद पांढरा नि अपारदर्शक बनला. त्याच पांढऱ्या कागदाला तेल फास, त्याच्या कणांकणांतून तेल झिरपेल असं कर आणि तो तात्बडतोब पार-दर्शक बनतो कीं नाहीं तें पहा! अरे, कागदच काय? कापसाचे धागे, लोकरीचे धागे, लांकडांतल्या शिरा, इतकंच काय, पण **हाडंसुद्धा पारदर्शक बनूं शकतात.** हाडं, मांस, केस, नखं, मज्जा हें सगळं सगळं पारदर्शक बनूं शकतं. केंप, माणसाच्या

सबंध शरीराचे मूळ घटक पारदर्शक असेच आहेत—फक्त दोन घटक सोडून. हे दोन घटक म्हणजे दोन प्रकारच्या रंगपेशी होत. एक आपल्या रक्तांतल्या लाल रंगपेशी अन् दुसऱ्या आपल्या केसांच्या काळ्या रंगपेशी. अशा रीतीनें आपलं मूळ शरीर जवळ जवळ पारदर्शक आहे. बहुतेक प्राण्यांचं मूळ शरीर पारदर्शक आहे म्हटलंस तरी चालेल. फारच थोडे संस्कार होऊन हीं शरीरं अपारदर्शक बनलीं!"

"खरं आहे!" केंप एकदम उद्गारला. "कालच रात्रीं मी समुद्रांतल्या अळ्यांबद्दल नि जेलीफिशबद्दल विचार करत होतों."

"अगदीं बरोबर!" ग्रिफिन म्हणाला. "आतां कसा मार्गावर आलास! जेलीफिश हा मासा संपूर्ण पारदर्शक असतो अन् पाण्यांत तर तो दिसतसुद्धा नाहीं. हें सगळं तुझ्या आत्तां ध्यानांत येतं आहे. माझ्या मात्र तें सहा वर्षांपूर्वीच ध्यानांत आलं होतं. मीं लंडन सोडल्याला एक वर्ष झालेलं होतं. या सर्व गोष्टींचं सूत्र माझ्या लक्षांत आलं, पण मीं तें कुणालाही बोलून दाखवलं नाहीं. मला अतिशय अडचणींतून मार्ग काढायचा होता. माझ्या संशोधनाच्या मार्गांत संकटांचे डोंगर उभे होते. एक तर माझ्याचबरोबर काम करणारे, माझ्यापेक्षां वयस्क, जुने असे कांहीं अनुभवी विद्यार्थी होते. त्यांचीं तुटपुंजीं संशोधनं चालू होतीं. मी कांहीं करायला लागलों कीं त्यावर झडप घालायला ते टपलेले होते. त्यामुळें माझ्या प्रयोगांचा बभ्रा करायला मी भीत होतों. हो, दुसराच कुणी तरी पुढें होऊन माझ्या शोधांचं श्रेय लाटायचा! तें मला टाळायचं होतं. म्हणून कुणाजवळही अवाक्षर न काढतां डोंगळ्याच्या चिकाटीनें मीं काम चालू ठेवलं अन् माझं संशोधन जवळ जवळ सफल होण्याच्या

पंथाला लागलं. प्रयोग यशस्वी होतांच त्याचा एकदम स्फोट करून सबंध जगाला धक्का द्यायचा अन् एका रात्रींत जगाद्विख्यात बनायचं असं मीं ठरवलं होतं. रंगपेशींवर मीं अत्यंत सूक्ष्म असा अभ्यास केला, शेंकडों प्रयोग केले आणि अखेरीस शरीरविज्ञानांत खळबळ माजवील असा एक शोध लावला. अगदीं योगायोगानें हा शोध लागला म्हटलं तरी चालेल."

"असं?"

"कॅंप, तुला माहीत नसेल, पण रक्तांतल्या लाल रंगपेशी पांढऱ्या बनवतां येणं शक्य आहे. त्यांचा तांबडेपणा घालवून त्यांना पांढऱ्या किंवा बिनरंगी बनवणं शक्य आहे. अन् तेंही त्यांच्या आंगचा एकही गुण वाया न घालवतां!"

"काय म्हणतोस!"

अदृश्य माणूस उठला आणि खोलींत येरझारा घालूं लागला.

"तुला आश्चर्य वाटणं अगदीं साहजिक आहे. मला—मला ता रात्र अजून आठवते. बरीच उत्तररात्र होती. दिवसा तर हीं कामं करणं अशक्यच. मूर्ख विद्यार्थी लेकाचे आ वासून भोवतीं जमलेले असायचे. मी आपला रात्रींच प्रयोग करीत असे—कधीं कधीं पहाटेपर्यंत. आणि एक दिवस—एका रात्रीं अकस्मात् विजेप्रमाणें माझ्या डोक्यांत प्रकाश पडला! त्या वेळीं मी प्रयोग-शाळेंत एकटाच होतों. सर्वत्र सामसूम होती. खोलींतले दिवे शांत-पणें स्थिरपणें जळत होते—मी म्हणालों, 'प्राण्याला पारदर्शक करतां येईल—त्याच्या अंगांतला धागान् धागा, कणन् कण पारदर्शक करतां येईल!—अदृश्य करतां येईल! फक्त रंगपेशी सोडून!—मी—मी स्वतः अदृश्य होऊं शकेन' स्वतःशींच मी हें बोलत होतों अन् बोलतां बोलतां माझं शरीर रोमांचित होत होतं. मी

खिडकीजवळ गेलों अन् बाहेर आकाशांत विखुरलेल्या तारकांकडे पहात पुन्हा म्हणालों, 'मी अदृश्य होऊं शकेन.'

"अदृश्य होणं! अंतर्धान पावणं! कोणती जादू, कोणतं इंद्र-जाल यापेक्षां श्रेष्ठ असूं शकेल? एकदा अंतर्धान पावतां आलं कीं मी काय काय करूं शकेन! मला रोखायची ताकद मग कुणाच्यांत असणार आहे? सर्व दृष्टींनीं स्वतंत्र, सत्ताधारी बनेन मी!—केंप, त्या क्षणाला माझ्या डोळ्यांपुढें केवढीं मनोराज्यें दिसूं लागलीं म्हणून सांगूं? इतके दिवस एका जिल्हा-कॉलेजांत बिनडोक विद्यार्थ्यांना शिकवणारा मी भुक्कड, दरिद्री डेमॉन्स्ट्रेटर! अन् आतां—त्रिखंड कीर्ति नि अपार वैभव माझ्यापुढें चालून येत होतं. या प्रचंड मोहापुढें श्रमांना किंमत नव्हती. माझ्या जागीं कोणी असतं, तूं जरी असतास तरी हेंच केलं असतंस. तीन वर्षं मीं या विषयाला वाहून घेतलं. संकटांचा एक एक डोंगर मीं पार पाडायचा अन्—अन्—त्याच्या शिखरावरून पलीकडे दुसरा डोंगर मला दिसायचा. असे किती तरी डोंगर मीं ओलांडले. प्रयोग म्हणजे चेष्टा नव्हती. त्यांतली प्रत्येक सूक्ष्म बारीकसारीक गोष्ट-सुद्धा जपून करायला हवी होती; कित्येकदा मन त्रासायचं, वैतागायचं. असं वाटायचं, कीं बस्स् झालं, नकोच ही कटकट! मोठ्या प्रयासानें मी पुन्हा कामाला लागायचा. ते दुसरे विद्यार्थी टपलेले असायचेच. मधून मधून विचारायचेही, 'काय हो, हें जें कसलं संशोधन चालवलंय् तुम्हीं, तें पुरं कधीं होणार?'

"आणि अशा रीतीनें तीन वर्षं गेलीं अन् मला शेवटीं असं आढळून आलं कीं ही गोष्ट असाध्य आहे!"

"कां?"

"पैसा!" अदृश्य माणसानें उत्तर दिलें; आणि पुन्हा तो

खिडकीपाशीं जाऊन उभा राहिला आणि बाहेर पाहूं लागला.

मध्येंच त्यानें खिडकीकडे पाठ वळवली आणि तो म्हणाला, "पैशाशिवाय जगांत कांहीं करतां येत नाहीं, केंप! तेव्हां मीं पैशाची सोय करून घेतली. मीं—मीं—एक जबरदस्त डाका मारला."

* * *

## १४ जिवंत मृत्यु

"कॉलेज मीं केव्हांच सोडलेलं होतं" अदृश्य माणूस सांगूं लागला. "मीं एक स्वतंत्र खोली घेतली होती. चोरीच्या पैशांतून मला लागणारं सामान मीं खरेदी केलं अन् या खोलींत प्रयोगाला सुरवात केली.

"प्रयोग फारच गुंतागुंतीचा होता. केंप, तुला मी तो सवडीनें समजावून देईन. त्या खरबुज्या इसमानें जीं पुस्तकं पळवलीं त्यांत तो सगळा सांकेतिक भाषेंत लिहिलेला आहे. काय वाटेल तें करून त्या माणसाला पकडलं पाहिजे अन् तीं पुस्तकं मिळवलीं पाहिजेत. पण तुला आत्तां प्रयोगाचा मुख्य भाग सांगतों. तो हा, कीं जो पारदर्शक पदार्थ आपल्याला अदृश्य करायचा असेल—म्हणजेच ज्याची वक्रीकरणशक्ति कमी करायची असेल, तो दोन विद्युद्ग्राहक केंद्रांच्या मध्यें ठेवणं. वातावरणांतल्या सूक्ष्म कंपनांतून हे विद्युत्किरण निर्माण करायचे असतात....अं हं! ते रॉन्टजेन किंवा क्ष किरण म्हणतात, ते नव्हेत बरं का हे? हे माझे 'किरण' निराळेच आहेत आणि त्यांचं वर्णन अजून कुठेंही प्रसिद्ध झालेलं नाहीं. ते

निर्माण करण्यासाठीं दोन डायनॅमोंची जरूर होती. मीं एका गॅस एंजिनवर हे डायनॅमो चालवले—पहिला प्रयोग मीं केला तो एका लोकरीच्या चिरगुटावर. डायनॅमो चालू होऊन विद्युत्किरण निर्माण होतांच मऊ मऊ नि पांढरं शुभ्र असं तें कापड थोडा वेळ चकाकलं आणि मग....धूर जसा हवेंत विरून जातो ना, तसं अक्षरशः हवेंत विरून गेलं !

" मी डोळे ताणून तिकडे पाहातच राहिलों. माझ्या डोळ्यांवर माझा विश्वासदेखील बसेना. मीं हात पुढें केला, तेव्हां कापड हातांत आलं. पूर्वीसारखंच तें मऊ लागत होतं. तेवढंच मोठंही होतं....त्याच्या धाग्यालाही धक्का लागलेला नव्हता. तें हातांत घेऊन दाबतांना मला चमत्कारिक वाटलं. कारण तसं पाहिलं तर माझ्या हातांत कांहींच नव्हतं. अन् कापड तर हाताला लागत होतं.

" माझा प्रयोग यशस्वी झाला होता. मीं दृश्य कापडाला अदृश्य केलं होतं.

" इतक्यांत एक आणखी चमत्कारिक प्रकार घडला. माझ्या मागें ' म्यांव् ' असा आवाज आला. वळून पाहिलं तों एक हाडकुळं पांढरं मांजर ! खिडकीबाहेरच्या गच्चीवर पाण्याची टाकी होती, त्या टाकीच्या झाकणावर मावशी आळस देत उभ्या होत्या. माझ्या मनांत कांहीं कल्पना आली. ' या मावशी ' मी तिला चुचकारीत म्हणालों. ' तुमच्यासाठीं सगळी सिद्धता झालेली आहे.'

" बिचारी मांजरी भुकेलेली होती. ती ' म्यांव् म्यांव् ' करीत आशाळभूतपणें माझ्याकडे आली. मीं तिच्यापुढें बशी ठेवली, बशींत थोडं दूध ओतलं. मीं माझं चहाफराळाचं सामान खोलीं-

तच एका कपाटांत ठेवीत असें. दूध प्याल्यावर मावशी खोलीभर वास घेत मजेंत हिंडूं लागल्या. वाटेंत त्यांना ती लोकरीची चिंधी लागली असावी; कारण क्षणमात्र त्या गोंधळलेल्या दिसल्या. मीं तिला उचलली आणि एका उशीवर ठेवली....आणि थोपटलं. तिला थोडंसं लोणीही खायला दिलं."

"अन् मग प्रयोग केलास तिच्यावर?"

अदृश्य माणूस म्हणाला, "होय. प्रयोग केला. पहिल्यानें तिला कांहीं औषधं खायला दिलीं. मांजराला औषध खायला देणं सोपं काम नाहीं, केंप....आणि माझा प्रयोग फसला.".

"फसला?"

"दोन बाबतींत फसला. तिचीं नखं अन् एक विशिष्ट रंगपेशी. डोळ्याच्या बुबुळांमागें ज्या रंगपेशी असतात ना, त्या! किती केलं तरी हीं दोन नाहींशीं होईनात. पहिल्यानें मीं तिचं रक्त धुवून निघावं म्हणून तिला कांहीं खायला दिलं. नंतर अफू खायला दिली अन् मग तिच्यासकट उशी उचलली नि माझ्या जादूच्या यंत्रावर ठेवली. विद्युत्प्रवाह चालू केला अन् मांजरी दिसेनाशी होत चालली. पण तिचे ते डोळे जाईनात. ते तसेच लुकलुक करत राहिले."

"हं! भारीच विचित्र!"

"मलाही याचा उलगडा होईना. मीं तिला पट्टयांनीं बांधून पक्कं केलेलं होतं. पण जरा वेळानें ती उठली. त्या वेळीं धुंदी पुरती गेलेली नव्हतीच. 'म्यांव–म्यां–'ती केविलवाण्या सुरांत ओरडायला लागली. इतक्यांत....कुणींतरी दार ठोकलं.

"मीं दार उघडलं. खालच्या मजल्यावर राहाणारी म्हातारी चौकशीला आली होती.

"'मांजर ओरडलं का हो इथें?' तिनें विचारलं. 'आमच्या मांजरीसारखं वाटलं.' 'नाहीं. इथें नाहीं' मीं म्हटलं. तरी पण त्या संशयी बाईनें खोलींत डोकावून पाहिलंच. कसंतरी तिचं समाधान करून मीं तिला परतवलं."

"किती वेळ लागला....या प्रयोगाला?"

"तीन चार तास. हाडं, स्नायु केस, नि चरबी सर्वांत शेवटीं गेलीं. डोळ्याच्या मागचा भाग मात्र गेलाच नाहीं. चकचक करीत राहिला.

"हा प्रयोग पुरा होईतों बाहेर काळोख पडला होता. मांजराचे फक्त डोळे नि नखं शिल्लक दिसत होतीं. मीं यंत्र थांबवलं, चांचपून पाहिलं, त्या प्राण्याला थोपटलं.—अजूनही तें बेशुद्धच होतं–त्याचे पट्टे सोडून त्याला मोकळं केलं. मग मीही दमलों होतों. म्हणून त्याच्या अदृश्य उशीवर त्याला झोपवून मीही पलंगावर पडलों.

"पण मला झोप येईना. सारखे त्या प्रयोगाचे विचार माझ्या मनांत येत होते. सभोवतालचे सर्व जिन्नस हळुहळू अंतर्धान पावताहेत असा कांहींतरी भास मला होत होता. सगळीकडे धुक्याचं वातावरण पसरल्यासारखं वाटत होतं. मला गळून गेल्यासारखं वाटत होतं आणि मनावर कसलं तरी भीतीचं दडपण बसलं होतं. मला असं वाटलं कीं साऱ्या साऱ्या वस्तु दिसेनाशा होत आहेत, आपल्या पायांखालची जमीनदेखील दिसेनाशी होत आहे...

"रात्रीं दोन वाजतां मांजरानें 'म्यांव् म्यांव'ला सुरवात केली. मीं उठून पाहिलं तों दोन लुकलुकणारे डोळे खोलीभर हिंडत होते. मोठ्या मुष्किलीनें मीं त्याचा पाठलाग केला. चांचपडत त्याला कसं तरी पकडलं आणि खिडकी उघडून बाहेर फेकून

दिलं. त्याचं केकटणं थोडा वेळ ऐकूं येत होतं. मग एकदम साम-सूम झाली. कुठें पळून गेलं, कुणास ठाऊक!"

"म्हणजे जगांत आज एक अदृश्य मांजर आहे म्हणतोस?"

"त्याला कुणीं मारलं नसलं तर असणारच. पण मला वाटतं, तें मेलं असेल. चार दिवसांनंतर त्याचा मला एकदा सुगावा लागला. टिचफील्ड स्ट्रीटवर लोकांची गर्दी जमली होती. गटारां-तून कुठून तरी मांजराचं ओरडणं ऐकूं येत होतं पण मांजराचा मात्र पत्ता नव्हता! लोक गोंधळून या भुताटकीचा शोध लावीत होते."

मिनिटभर ग्रिफिन शांत बसला होता. नंतर एकदम म्हणतो, "आतां माझं स्वतःचं प्रकरण ऐक—

"ज्या दिवशीं माझ्यांत हा भयंकर कायापालट—किंवा काया-लोप म्हण—झाला त्याच्या आदल्या दिवसाची सकाळ मला पक्की आठवते. मी पोर्टलंड स्ट्रीटवरून फिरत फिरत बराच दूर गेलों असेन. कारण आल्बनी स्ट्रीटवरच्या सोजिरांच्या बराकी माझ्या डोळ्यांपुढें आहेत. मी अतिशय दमलों होतों, अंगांत कसर वाटत होती. शेवटीं अगदीं गळून जाऊन गांवाबाहेरच्या एका टेकडीवर आंग टाकलं. जानेवारी महिना होता. ऊन चांगलं पडलं होतं, पण हवेंत गारठाही होता.

"मी पडल्या पडल्या माझ्या निःशक्त मेंदूला शिणवूं लागलों.

"आतां पुढें काय करायचं तें लवकर केलं पाहिजे....

"पण माझ्या सर्व मेहनतीचं फळ माझ्या अगदीं तोंडाशीं आलं असतांना आतांच मला विलक्षण थकवा वाटूं लागला होता. उत्साह कसा तो अंगांत उरलाच नव्हता. चार वर्षांच्या अति-श्रमांचा तर हा परिणाम नसेल?

"माझी ती सगळी धडाडी गेली कुठें? ज्या बेदरकार वृत्तीनें, तडफीनें आपण आपल्या ध्येयासाठीं दरोडा घालायलाही कमी केलं नाहीं, ती तडफ गेली कुठें?

"कदाचित् हा थकवा, मलूलपणा क्षणिक असेल अन् घरीं गेल्यावर आपण पुन्हा उत्साहानें कामाला लागूं. पण कांहीं झालं तरी आपला अचाट जंगी प्रयोग आतां करायला हवा एवढं खरं. कारण आपल्याजवळचे पैसे आतां अजिबात संपले आहेत.'

"मीं आजूबाजूला नजर फिरवली. टेकडीवरच्या हिरवळीवर कोंवळ्या उन्हांत मुलें खेळत होतीं. माझ्या मनांत विचार आले.... एकदा मी अदृश्य झालों कीं हें सगळं सगळं जग माझं आहे—

"थोड्या वेळानें मी उठलों. कसाबसा घरीं गेलों; थोडंसं खाल्लं आणि मग स्ट्रिक्निनचा एक जबरदस्त घोट घेतला. नंतर तसाच पलंगावर आडवा झालों—भरपूर झोप घेतली. उठलों तेव्हां माझ्या अंगांत उत्साह सळसळत होता पण तितकंच त्रासल्यासारखं वाटत होतं."

"स्ट्रिक्निननें तसंच होतं. एवढं मादक विष जगांत दुसरं नसेल!" केंप म्हणाला.

"मी उठलों त्या वेळीं दारावर कुणी तरी ठक ठक करतं आहे असं मला वाटलं. मीं दार उघडलं अन् आमचा ज्यू घरमालक आंत शिरला. त्यानें धमक्या नि शिवीगाळी द्यायला सुरवात केली. तळमजल्यावरच्या बाईनें त्याच्याकडे तक्रार केली होती हें नक्कीच. त्यानें आतां सरळ माझ्यावर आरोप केला, कीं 'रात्रभर तुम्ही एका मांजराचा छळ चालवला होता. शेवटीं तुम्हीं नक्कीच त्याचा जीव घेतलात. मुक्या प्राण्यांचा छळ करणाराला कायद्यांत कडक शिक्षा सांगितली आहे हें माहीत आहे का तुम्हांला?—अन् हे कसले घाणेरडे प्रयोग

करीत असतां? रात्रभर या यंत्राच्या आवाजानें कान किटले तरी तुम्हांला त्याची कांहीं याद? कसलं आहे हें यंत्र पाहूं बरं?'....

"बोलतां बोलतां तो जेव्हां माझ्या यंत्राजवळ जाऊन त्याला हात लावूं लागला तेव्हां मात्र मला राहावेना. मी वेगानें त्याच्या अंगावर धावून गेलों, त्याची कॉलर पकडली अन् त्याला फरपटत ओढून दरवाजाबाहेर भिरकावला. मग खाडदिशीं दार लावून घेतलं.

"बाहेर अर्थात् एकच खळबळ उडाली. पण मीं तिकडे पूर्ण दुर्लक्ष केलं.

"पण सारखं दुर्लक्ष करून भागणार नव्हतं. एकंदर प्रकरण आतां एवढ्या थराला पोचलं होतं कीं त्यांतून सुटायचा मार्ग तांतडीनें काढणं भाग होतं. घरमालक काय करील किंवा काय करण्याची कायद्याप्रमाणें त्याला शक्ति आहे याची नीट कल्पना मला नव्हती. पण समजा, त्यानें हाकलून दिलं तर जायचं कुठें? दुसरी जागा कुठून मिळवायची? माझ्याजवळ आतां फक्त वीस पौंड शिल्लक होते. तेसुद्धा बँकेंत.

"सुटायचा मार्ग माझ्या हातांत होता आणि तो म्हणजे अंतर्धान पावणं!

"पण मग हे लोक माझ्या खोलीवर धाड टाकल्याशिवाय नक्कीच राहाणार नाहींत. आपल्या आवडत्या सामानाची ते नासधूस करणार ही कल्पनाच मला सहन होईना. माझ्या अंगावर कांटा उभा राहिला.

"माझ्या तिन्ही टिप्पणवह्या मीं घेतल्या, माझं चेकबुकही घेतलं—हें सगळं आतां त्या खरबुज्याजवळ आहे—अन् जवळच्या पोस्टांत

गेलों. तिथून हें पार्सल पोर्टलंड स्ट्रीटच्या पत्त्यावर पाठवण्याची मीं व्यवस्था केली अन् गुपचूप परत आलों.

"जिन्यांतच माझी घरमालकाशीं गांठ पडली. तो दचकला. मी मुद्दामच लांब लांब टांगा टाकीत त्याच्या मागें लागलों. तो असा घाबरला नि असा पळाला म्हणतोस! मी सरळ माझ्या खोलींत गेलों अन् धाडकन् दार लावून घेतलं. घरमालक बाहेर थोडासा घुटमळला असावा असं बाहेरच्या खसबशीवरून मला वाटलं. शेवटीं तो निघून गेला असावा.

"त्या रात्रीं मीं तो महाभयंकर प्रयोग पार पाडला. पहिल्यानें तीं औषधं पोटांत घेतलीं—रक्ताचा रंग घालवणारीं औषधं. त्यांच्या रुचीनें मला घृणा आल्यासारखं झालं. कमालीची सुस्ती वाटायला लागली.

"मध्येंच कुणीं तरी दार ठोकलं. मीं लक्ष दिलें नाहीं. पुन्हा ठोकलं. पुन्हा....पुन्हा....पुन्हा—

"मी त्रासून उठलों, दार उघडलं. 'काय आहे?' मीं गुरकावलों.

"घरमालक हातांत एक कागद घेऊन उभा होता. मीं तो हिसकावला. जागा खालीं करण्याबद्दलची ती नोटीस होती. ती मी वाचीत असतांना त्यानें माझ्या हातांकडे पाहिलं असावं. काय त्याला वाटलं कुणास ठाऊक....चमकून त्यानें माझ्या चेहऱ्याकडे पाहिलं. क्षणभरच आ वासून तो माझ्याकडे बघत राहिला. मग एक अस्फुट किंकाळी फोडून त्यानें हातांतली मेणबत्ती खालीं टाकली; आणि धडपडत, अडमडत तिथून पळ काढला.

"मीं दार बंद केलं; आंतून कुलूप लावलं. आरशाकडे गेलों.

"घरमालक कां भ्याला त्याचं कारण मला कळलं. माझा चेहरा पांढरा फटक पडला होता. खडूसारखा पांढरा!

"पण हें तर कांहींच नाहीं. ज्या भयंकर यातना मला सहन कराव्या लागल्या त्यांची तुला कल्पनाही होणं शक्य नाहीं. मला-देखील कल्पना नव्हती. रात्रभर माझ्या अंगांतून कळा निघत होत्या, डोकं गरगरत होतं—घृणा, अतिशय तीव्र घृणा–मला आली होती. माझं सबंध शरीर जणू पेटलं होतं, चितेवर घातलं होतं. जिवंत मृत्यु होता तो. पण मी तें सगळं सोशीत होतों, मुकाट्यानें सोशीत होतों. मेल्यासारखा निपचित पडून सगळं मी सहन करीत होतों.

"त्या वेळीं मला मांजराच्या दुःखाची कल्पना आली. मांजर इतकं विवळलं कां,—क्लोरोफॉर्म देईपर्यंत त्याचं विवळणं कां थांबलं नाहीं, तें आत्तां मला कळलं.

"ती रात्र मीं कशी काढली असेल तें माझं मला माहीत. मध्येंच स्फुंदत होतों, कण्हत होतों, बरळत होतों, ओरडत होतों. ...पण....पण सगळं कांहीं सोसत होतों. शेवटीं...शेवटीं माझी शुद्धबुद्ध पार हरपली."

★ ★ ★

# १५ फुकट फौजदारी–फुकट प्रवास!

"मी जागा झालों तेव्हांही अंधारच होता. माझ्या वेदना थांबल्या होत्या. पण मला असं वाटत होतं कीं हा आत्मघात आहे. हें आपलं मरण आपण आपल्या हातांनीं ओढून आणतों आहों. पण मला पर्वा नव्हती.

"ती पहाट मी जन्मभर विसरणार नाहीं. मीं पहिल्यानें जेव्हां माझ्या हाताकडे पाहिलं तेव्हां मला विलक्षण भीति वाटली. कारण माझे हात ढगाळलेल्या कांचेसारखे दिसत होते. जसजसा वेळ जाऊं लागला तसतसे ते जास्त जास्त पात्तळ, नित्तळ स्वच्छ दिसायला लागले आणि शेवटीं...शेवटीं, केंप, ते अगदीं पारदर्शक बनले. माझ्या हातांमधून मला पलीकडचं दिसूं लागलं. खोलींतला तो पसारा, माझा मला, माझ्याच शरीरांतून दिसायला लागला. घाबरून मीं डोळे मिटून घेतले तरी तें दृश्य दिसायचं राहिलं नाहीं; कारण माझ्या पापण्यासुद्धा पारदर्शक बनल्या होत्या. माझे सर्वच अवयव कांचेसारखे बनले, हाडं नि रक्तवाहिन्या पुसट दिसूं लागल्या अन् पाहतां पाहतां अदृश्य झाल्या. बारीक मज्जातंतु शेवटपर्यंत होते. तेही एकदाचे दिसेनासे झाले आणि अखेर उरलं काय? तर बोटांचीं नखं—फिक्कट पांढरीं नखं आणि बोटांना ॲसिड लागलं होतं तेवढा एक डाग.

"हा अद्भुत भयंकर प्रकार पहात मी शेवटपर्यंत एका जागीं उभा होतों. अखेरीस उठलों. मला अतिशय थकवा आलेला होता. भूकही कडकडून लागली होती. आणि एक प्रकारचा चमत्कारिक पंगुपणा माझ्यांत आला होता. एखादं दुपट्यांत गुंडाळलेल मूल

जसं आपल्या आपण हिंडूं फिरूं शकत नाहीं तशी माझी स्थिति झाली होती. कारण माझे हातपाय मला दिसत नव्हते.

"मी तसाच धडपडत आरशाजवळ गेलों. आरशांत पाहिलं—काय? कांहीं नाहीं. फक्त डोळ्याच्या पाठीमागली बाजू अद्याप अदृश्य झालेली नव्हती, तेवढ्याच भागाचं प्रतिबिंब मला दिसलं. तेंदेखील अगदीं पुसटसं होतं. काय वाटलं असेल मला त्या वेळीं? केंप, कल्पना कर! आरशांत बघितलं कीं असेल तसा तंतोतंत मुखडा दिसलाच पाहिजे अशी आपल्याला संवय असते. त्या दिवशीं मात्र आरशानें माझ्यावर मात केली....कीं मीं आरशावर केली?

"मेजाची कडा मीं दोन्हीं हातांनीं—न दिसणाऱ्या हातांनीं—घट्ट पकडली आणि पुन्हा पुन्हा आरशाकडे वेडयासारखा पाहूं लागलों. पुढें वाकलों, आरशाला कपाळ टेकलं. तें टेकलं गेलंही. पण आरशांत मात्र कांहीं दिसेल तर कपाळ!

"मोठा जबर प्रयत्न करून मी पुन्हा माझ्या यंत्राकडे गेलों अन् प्रयोगाचा उरला सुरला भाग पूर्ण केला.

"मग प्रकाश सहन होईना म्हणून डोक्यापर्यंत पांघरूण ओढून मी झोपून राहिलों.

"दुपारीं बाराच्या सुमाराला उठलों. पुन्हा कुणीतरी दारावर ठकठक करीत होतं.

"आतां अंगांत बळ आल्यासारखं वाटत होतं. मी बिछान्यांत उठून बसलों अन् कानोसा घेतला. बाहेर कांहींतरी कुजबुज चाललेली मला ऐकूं आली.

"मीं ताडदिशीं बिछान्यांतून उडी मारली. अगदीं जराही आवाज न करतां मी यंत्राजवळ गेलों; आणि यंत्राचे सर्व भाग

वेगवेगळे करून ते इतस्ततः फेकायला सुरवात केली. इतक्यांत पुन्हा दार वाजलं. घरमालकाचा आणि दुसऱ्याही एकदोघांचे आवाज ऐकूं आले. कुठून तरी थोडा वेळ मिळावा म्हणून मीं 'आलों.....उघडतोंच' असं म्हटलं अन् काम चालू ठेवलं. अदृश्य उशीवर नि त्या लोकरीच्या कपड्यावर माझा हात पडला. मीं खिडकी उघडली नि त्या दोन्ही जिनसा बाहेर फेकून दिल्या. त्यांच सुमाराला दारावर जोराचा धक्का बसला. कुलूप फोडण्याच्या हेतूनें कुणीतरी दारावर धडका मारीत होतं. पण दाराचा कोयंडा मजबूत होता. कांहीं दिवसांपूर्वीं मींच त्याला स्क्रू मारून आणखी पक्का बनवलेला होता. पण दार फोडण्यापर्यंत यांची मजल पोंच-लेली पाहून मात्र माझी घबराट उडाली. मी थरथर कांपूं लागलों अन् हातांतलीं कामं भराभर उरकूं लागलों.

"इकडचे तिकडचे रद्दी कागद मीं गोळा केले, बाटल्यांच्या पार्सलांतून आलेल्या कागदी चिंध्याही गोळा केल्या, जो सांपडेल तो कचरा जमवला अन् सगळ्याचा खोलीच्या मध्यभागीं एक ढीग रचला. दरम्यान दारावर धडाधड धडका बसूं लागल्या.... मला आगपेटी सांपडेना.

"मी त्रासलों, संतापलों. भिंतीवर बुक्के मारूं लागलों. गॅस बंद केला होता तो मीं पुन्हा चालू केला. मग खिडकी उघडली अन् बाहेर उडी टाकली. हलक्या हातानें खिडकी पुन्हा लावून घेतली अन् पाण्याच्या टाकीवर बसून राहिलों. त्या वेळीं मी अदृश्य असल्यामुळें पूर्णपणें सुरक्षित होतों. पण संतापामुळें माझ्या अंगाची लाहीलाही झाली होती अन् मी थरथर कांपत होतों.

"माझं सारं लक्ष माझ्या खोलीकडे लागलं होतं. मला बाहेर पडून थोडासा वेळ झाला नाहीं तोंच खोलीचा दरवाजा मोडून

पडल्याचा आवाज झाला अन् बाहेरची मंडळी खोलींत घुसतां- नाही मला कांचेच्या तावदानांतून दिसली. घरमालक नि त्याचे दोघे सावत्र मुलगे—पंचविशींतले तरुण होते ते. खोलींतला पसारा पाहून अन् त्याहीपेक्षां खोलींत कोणीच नाहीं असं पाहून त्यांना किती आश्चर्य वाटलं असेल याची कल्पना कर. त्यांतल्या एकाच्या मनांत काय आलं—तो धावतच खिडकीकडे आला. त्यानें खिडकी सताड उघडली, अन् वटारलेल्या डोळ्यांनीं तो बाहेर पाहूं लागला. माझ्यापासून एक फूट अंतरावरच असेल तो. इत- कंच काय, तो माझ्याकडे पहात होता, माझ्यांतून पलीकडे पहात होता, पण मीं मात्र त्याला दिसत नव्हतों! एकदोनदा तर त्याच्या त्या बावळट थोबाडावर एक ठोसा ठेवून द्यावा असा मला मोह झाला. पण मीं तो आवरला.

"दरम्यान घरमालकानें नि त्या दुसऱ्या मुलानें खोलीची संपूर्ण पाहणी केली. पलंगाखालीं वाकून बघितलं, कपाटांत पाहिलं, खुर्च्या हालवल्या. मग एकमेकाशीं कांहींतरी वाद घातला. शेवटीं त्यांनीं असं ठरवलं कीं आपण या माणसाचा आवाज ऐकला तो निव्वळ भास असावा.

"ती मांजरवाली म्हातारीही खोलींत आली अन् मांजरासारखी दबकत दबकत खोलींत हिंडूं लागली.

"त्या चार माणसांची उडालेली भंबेरी मी बाहेर स्वस्थ बसून पहात होतों. त्या वेळीं मला खरा आसुरी आनंद झाला होता.

"म्हातारी म्हणाली, 'हा नक्कीच चेटूक करणारा इसम आहे.' घरमालक गंभीरपणें मान डोलवून म्हणाला, 'मलाही तसंच वाटतं.' पण ते दोघे मुलगे यंत्राकडे कुतूहलानें पहात म्हणाले, 'आम्हांला

नाहीं वाटत तसं. तो विजेच्या नि रेडिओच्या कामांतला तज्ज्ञ असावा. एरवीं एवढं यंत्र कशाला त्यानें इथें बसवलन्?'

"त्यांच्या त्या फालतू चौकशा मला सहन होईनात. मला अशी भीति वाटली कीं हें यंत्र जर एखाद्या सुशिक्षित, साधारण जाणत्या माणसाच्या हातीं पडलं तर माझं बिंग फुटायचा संभव आहे. मी खिडकींत चढून बसलों अन् संधी सांपडतांच आंत उडी मारली. म्हातारी मध्यें आली, तिला सफाईनें टाळून मी यंत्राजवळ जाऊन पोचलों अन् दोन्ही डायनॅमो उचलून जमिनीवर धाड-दिशीं आपटले. त्यांच्या ठिकऱ्या ठिकऱ्या झाल्या.

"हा अकल्पित प्रकार पाहून ते फुकट फौजदार स्तंभित झाले. पण त्यांची घबराट पहायला मी तिथें थांबलों नाहीं. मी सपाट्यानें खोलीबाहेर धूम ठोकली अन् जिन्यानें खालीं गेलों.

"खालच्या मजल्यावर एका खोलींत दडून बसलों. कांहीं वेळानें माझ्या खोलींतलं संशोधन आटपून हे गांवढळ गुप्तपोलीस कांहीं-तरी निरर्थक कल्पना लढवीत खालीं आले. तेव्हां मी पुन्हा सटकलों अन् एक आगपेटी घेऊन वर गेलों. रद्दीचा ढीग अस्ता-व्यस्त पडलेला होताच—"

"त्याला तूं आग लावलीस?"

"हो, मीं घरच पेटवून दिलं. माझा मागमूस लागूं नये म्हणून मीं तें पेटवलं. दुसरा मार्गच नव्हता. शिवाय घराचा विमा उतरलेला असणारच—पुढच्या दरवाजाची कडी काढली, बाहेर सटकलों अन् रस्ता धरला.

"अदृश्य होऊन मीं केवढा प्रचंड सौदा मारला आहे तें हळुहळू माझ्या लक्षांत यायला लागलं होतं. भावी काळांत काय प्रचंड उलाढाली करायच्या त्याचे व्यूह मी आतां रचत होतों.

"मी रस्त्यावर सटकलों खरा, पण मला चालतांना किती अडचण वाटत होती तें तुला कळणं शक्य नाहीं, केंप ! चालतांना खालीं नजर जावी अन् नेहमींच्या सरावाचे पाय दिसूं नयेत ही कल्पनाच किती भयानक आहे ! मी ती प्रत्यक्षांत अनुभवीत होतों.

"पोर्टलंड स्ट्रीटवर आलों न आलों तोंच मला मागून धक्का बसला. वळून पहातों तों हातांत सोडालेमनच्या बाटल्यांची करंडी घेऊन चाललेला एक इसम. आपल्या हातांतली करंडी कशावर आपटली तें बिचाऱ्याला कळलं नाहीं. तो आपला आ वासून करंडीकडेच पहात होता. खरं म्हणजे त्या धक्क्यानें मला चांगलाच मार बसला होता. पण त्याची भ्रमिष्टावस्था पाहून मला इतकी मजा वाटली कीं मी खो खो हसत म्हणालों, "अरे बाबा, त्या करंडींत भूत आहे भूत !" आणि बोलतां बोलतां मीं ती करंडी त्याच्या हातांतून हिसकून घेतली अन् उंच हवेंत धरली. जवळच्या हॉटेलाबाहेर एक टांगेवाला पान चघळत उभा होता. कांहीं ध्यानीं मनीं नसतां एक सोडालेमनवाला आपली करंडी हवेवर उडवतो याचा त्यानें काय अर्थ लावला कुणास ठाऊक ! पण ती करंडी झेलायला तो पुढें आला नि सरळ माझ्या अंगावर आपटला. त्यानें पुढें केलेलीं बोटं माझ्या कानाभोवतींच आवळलीं गेलीं अन् माझा कान असा दुखला कीं ज्याचं नांव तें. मीं करंडी धाडदिशीं खालीं टाकली अन् टांगेवाल्याला दोनतीन रट्टे लगावले. एवढं होईतों त्या ठिकाणीं लोकांची गर्दी जमूं लागली होती. तेव्हां आपण केवढा मूर्खपणा करून बसलों ते माझ्या लक्षांत आलं. मीं एका दुकानाच्या फळीला टेकून उभा राहिलों अन् या सर्व गोंधळांतून वाट कशी काढायची याचा विचार करूं लागलों.

संधी साधून मीं एक सूर मारला पण एका खाटकाच्या पोरावर आपटलों. कुठच्या शून्यानें आपल्याला ढकललं तें वळून पहायची त्याला बुद्धि झाली नाहीं एवढं बरं झालं. मी पटकन् एका बग्गीमागें दडलों. अन् पुन्हा जरा मोकळं सांपडतांच सुंबाल्या करून ऑक्सफर्ड स्ट्रीटवर गेलों.

"इथेंही लोकांची गर्दी होतीच. मधून मधून कुणाचा तरी माझ्या पायावर पाय पडायचा अन् ओठांपर्यंत आलेली किंकाळी मी मोठ्या प्रयत्नानें दाबायचा. शेवटीं मी अगदीं कडेनें गटारां-तून चालूं लागलों. थोड्या वेळानें एक घोडागाडी येतांना दिसली. तेव्हां माझ्या मनांत एक कल्पना आली. मी झटदिशीं पुन्हा रस्त्यांत आलों अन् गाडीच्या मागें धावूं लागलों. अशा रीतीनें लोकांचे धक्के मला टाळतां आले पण धावून धावून पायही दुखूं लागले. तेवढ्यांत आणखी एक युक्ति मला सुचली. मी धावत पुढें गेलों नि पटदिशीं गाडींत चढून बसलों. अशा रीतीनें ऑक्सफर्ड स्ट्रीटवरून माझा फुकट प्रवास सुरू झाला.

पण मला आतां मौज वाटत नव्हती. एकतर थंडी अंगाला झोंबत होती अन् माझ्या अंगावर कपड्याची एक चिंधीसुद्धा नव्हती! मी खूप दमलोंही होतों अन् पाठीला कुठेंतरी खरचटलं होतं तें खूप दुखत होतं.

"गाडीनें टॉटेनहॅम कोर्ट रोडचं वळण घेतलं तोंपर्यंत आमचं अदृश्यपणाचं कोडकौतुक संपलं होतं. आतां या झेंगटांतून पार कसं पडायचं हेच विचार सतावत होते!

"वाटेंत पुस्तकाचं एक प्रसिद्ध दुकान लागलं. त्यांतून जाड्या-जाड्या पुस्तकांचा एक गठ्ठा घेऊन एक उंच जाडी बाई बाहेर पडली अन् तिनें 'गाडी' म्हणून पुकारा केला.

" माझ्या गाडीवाल्यानें गाडी उभी केली. बाईसाहेबांनीं गाडींत प्रवेश करण्यापूर्वींच मीं दुसरीकडून बाहेर उडी टाकली अन् पायीं प्रवास चालू केला. ब्लूम्सबेरी चौकांत जाऊन तिथून पुढें म्यूझियमचा रस्ता धरावा असं मीं ठरवलं. कारण त्या बाजूला वस्ती जरा विरळ होती.

" चौक ओलांडतांना जवळच्या इमारतींतून बाहेर पडलेलं एक कुत्रं आडवं आलं. म्हणजे जाणून बुजून माझ्या पुढें आलं. त्याला माणसाचा वास आला असावा. म्हणून तें जमिनीला नाक लावून चाललं होतं. त्याला कसाबसा टाळून मी पुढें सटकतों तों—

" थोड्या वेळानें एक नवीनच गोंधळ सुरू झाला. लोकांनीं धावपळ आरडाओरड आरंभली. काय झालं म्हणून मी इकडे तिकडे पहातों आहे तोंच ' आग ! आग ! ' म्हणून कल्लोळ ऐकूं आला.

" पोर्टलंड स्ट्रीटजवळच्या त्या गल्लीकडे लोक धाव घेत होते. माझ्या प्रयोगशाळेकडेच त्यांचा रोख होता.

" मीं एक जबरदस्त आवंढा गिळून आपल्याशींच म्हटलं, ' एकंदरींत सगळ्याची राख झाली म्हणायची ! तें यंत्र जळलं, तीं औषधं जळलीं, सगळं कांहीं जळलं ! कुणाची बिशाद आहे आतां माझं गुपित जाणून घ्यायची !....आतां....आतां तेवढं चेकबुक नि त्या टिप्पणवह्या मिळवल्या कीं झालं !'

★ ★ ★

## १६ कोईभी चीज उठाव....

"तुला सांगितलंच कीं हवेंत त्या वेळीं गारठा होता, इतकंच नाहीं तर बर्फाचं वादळ होण्याचीं चिन्हं होतीं. या बर्फवृष्टीलाच मी भीत होतों. कारण अंगावर थर सांचले असते तर मला पुन्हा अदृश्यांतून दृश्यांत यायला वेळ लागला नसता. अंगावरचे हिमतुषार भराभर निपटत मी चाललों होतों. आसरा शोधीत होतों. एकदा तर असंही वाटलं कीं येणाऱ्या जाणाऱ्या एखाद्या वाटसराच्या पायां पडावं अन् त्याच्या घरीं आश्रय घ्यावा. पण कुणाला सांगायचं नि कसं सांगायचं? त्याला तें खरं वाटलं पाहिजे! शिवाय कुणालाही विश्वासांत घ्यायचं म्हणजे आपलं रहस्य त्याच्याजवळ फोडायचं, आणि तें फोडल्यावर आपली काय किंमत राहील? आपले ते मोठमोठे मनोरथ कोसळणार नाहींत का? एकदा आपलं बिंग फुटल्यावर आपली किंमत फक्त एक सर्कशींतला प्राणी किंवा जत्रेंतला जिन्नस म्हणून राहील. शिवाय ज्याला आपण विनवायला जाऊं तो स्वतःच घाबरून गेला तर?—आणि भीतीमुळें पुढें त्यानेंच आपला छळ केला तर?

"या सगळ्या शंका कुशंका मला भेडसावीत होत्या. आणि तरी सुद्धा कुठें तरी झटपट आसरा घेणं जरुरीचं होतं हेंही खरंच! पण आसरा मिळत नव्हता. लंडनचीं खिडक्या-दारं मला—अदृश्य माणसालासुद्धा—अक्षरशः बंद होतीं. झोंबणाऱ्या गारठ्यांत नि बर्फाच्या वादळांत उघड्या हवेवर रात्र काढण्याची पाळी माझ्यावर आली होती.

"पण मला एकदम एक विलक्षण कल्पना सुचली. गौवर-स्ट्रीटवरून मी टॉटेनहॅम कोर्ट रोडवर आलों अन् त्याच क्षणीं

माझ्या सुपीक मेंदूनें आणखी एका विलक्षण कल्पनेला जन्म दिला.

" त्या वेळीं ' ऑम्नियम्स 'ची इमारत माझ्या पुढ्यांतच होती. तुला माहीतच आहे कीं ऑम्नियम्स ही लंडनमधली एक प्रचंड बाजारपेठ आहे. अनेक दुकानदारांनीं संघटित होऊन काढलेलं हें एक राक्षसी दुकान आहे. दुकान कसलं? त्याला शहरच म्हटलं पाहिजे. ताज्या भाज्या, फळं नि मांस–मासळीपासून ते टेबल खुर्च्या नि तसबिरींपर्यंत काय वाटेल ती वस्तु तिथें मिळूं शकते. इमारतीच्या प्रवेशद्वारापाशीं गणवेष घातलेला रखवालदार होता. त्याच्या अगदीं पुढ्यांतून मी सरळ ऑम्नियम्सच्या इमारतींत प्रवेश केला. आंत शिरून पहातों तों आपण मोजे, रिबनी, टोप्या वगैरे किरकोळ सुती मालाच्या विभागांत आलों आहों असं मला आढळलं.

" तिथेंही मला सुरक्षित वाटलं नाहीं. कारण गिऱ्हाइकं इकडून तिकडे हिंडत होतीं. कुणाचा धक्का लागला असता तर पंचाईत होती. पण बंद जागीं आल्यामुळें थोडीशी ऊब वाटली.

" मी बराच वेळ भटकलों अन् सर्व दुकानांची पाहणी केली. माडीवरही गेलों. तिथें पहिल्याच मजल्यावर पलंग, गाद्या, उशा वगैरे शयनगृहांतल्या सामानाचा विभाग दिसला. मला तेंच पाहिजे होतं. लगेच एका पलंगावर चढलों अन् बिछान्यावर तण्णावून दिली. अंगावरून एक झक्कपैकीं मऊ पांघरूण ओढून घेतलं अन् आरामांत पडलों. किलकिल्या डोळ्यांनीं दुकानदारांची नि गिऱ्हाइकांची टेहेळणी मात्र मीं चालवली होती. पडल्या पडल्या माझ्या मनांत आतां पुढचे विचार घोळूं लागले. मी म्हणालों, ' हा घाट बरा जुळून आला. आपल्याला हवी ती वस्तु आपण आतां इथून लुंगावूं शकतों. पहिल्यानें कपडे हवे होते. भरपूर कपडे.

सबंध आंग गुंडाळण्यापुरते कपडे. शिवाय पैशाचीही जरूर होती. एकदा पैसे हातीं आले कीं जरा नीटपणें राहतां येईल. आपल्या त्या वह्या नि तें चेकबुक मिळवतां येईल अन् मग आपल्या अदृश्यपणाचा फायदा घेऊन जें जें करायचं आपण ठरवलं आहे तें सगळं आपल्याला पार पाडतां येईल.' अजूनदेखील माझी महत्त्वाकांक्षा मेलेली नव्हती.

"एक तास लोटला अन् दुकानं बंद व्हायची वेळ झाली. मागें राहिलेलीं गिऱ्हाइकंसुद्धा निघून जाऊं लागलीं. नोकरांनीं येऊन खिडक्या-शटर बंद केले, अन् आवरा-आवर सुरू केली. इतक्या झपाट्यानें ते माल आवरून जिथल्या तिथें ठेवीत होते कीं ती चपळाई पाहून मला खरोखर आश्चर्य वाटलं. काऊंटरवरच्या कांहीं जिनसा उचलून कपाटांत किंवा फळ्यांवरून मांडण्यांत आल्या, तर कांहीं अवघड जिनसांवर जिथल्या तिथेंच किनतानं पसरण्यांत आलीं. शेवटीं खुर्च्याही उचलून त्यांनीं काऊंटरवर उलट्या ठेवल्या. एवढं केल्यावर दुकानदार नि त्यांचे नोकर निघून गेले; अन् झाडूवाल्यांचा जथ्था आला. त्यांनीं बादल्या भरून पाणी आणलं; सगळीभर ओतलं, त्यावर लाकडाचा भुस्सा पेरला अन् मोठ्या थोरल्या खराट्यांनीं फरशी धुवायला आरंभ केला.

"मी हळूच उठलों अन् भुशाचा स्पर्श होऊं नये किंवा निसटून पडूं नये म्हणून जपून पावलं टाकीत सगळीभर हिंडूं लागलों. फरशीची सफाई जवळ जवळ तासभर चालली होती. तेवढ्या वेळांत मी सर्व मजले हिंडून आलों. नंतर तेही नोकर निघून गेले आणि पुढचा दरवाजा बंद झाल्याचा आवाज ऐकूं आला. मग सर्वत्र सामसूम झाली.

"आतां त्या अफाट इमारतींत माझंच राज्य होतं! पहिल्यानें

मी मोज्यांच्या विभागांत गेलों. तिथें अंधार होता. गल्ल्याचा खण उघडून त्यांतली आगपेटी काढीपर्यंत बराच वेळ गेला. मग काडी-मागून काडी शिलगावीत मीं एक मेणबत्ती हुडकून काढली. ती पेटवली अन् मग तिच्या उजेडांत मला हव्या त्या जिनसा निवडूं लागलों. पायमोजे, जाड गंजीफ्रॉक, हातमोजे माझ्या मापाचे शोधून काढले. नंतर दुसऱ्या विभागांत जाऊन शर्ट, कोट, पाटलोण अगदीं फिट्टंफाट बसतील अशीं निवडलीं. एक मोठा थोरला ओव्हरकोटही घेतला. रुंद कंगोऱ्याची एक काळी नरम हॅट घेतली—पाद्री लोक घालतात तसली. हा सगळा जामानिमा करून पायांत ऊबदार बूट चढवल्यावर मला माणसांत आल्या-सारखं वाटूं लागलं.

"मग पोटांतल्या कावळ्यांची कावकाव मला ऐकूं आली.

"तिसऱ्या मजल्यावर उपाहारगृह होतं, तिकडे गेलों. सैंपाक-घरांत शिरलों. तिथल्या फडताळांतून शिळं मटण होतं, तें मीं अधाशासारखं खाल्लं. मेजावर किटली होती अन् किटलींत थंड कॉफी होती. तिथली गॅसची शेगडी पेटवून मीं कॉफी गरम करून घेतली. ती प्याल्यावर मला बरीच हुशारी आली. मग कांहीं बरण्या उघडल्या नि बिस्किटं, चॉकलेट, केक जें कांहीं हाताला लागेल त्यावर ताव मारला. फिरत फिरत खेळण्यांच्या विभागांत गेलों. तिथें मला जत्रेंत मिळतात तसले मुखवटे दिसले; आणि केंप, बनावट नाकं दिसलीं—

"तीं नाकं पाहिल्याबरोबर माझ्या प्रतिभेनें आणखी एक उसळी खाल्ली. आतांपर्यंत नाकाचा प्रश्न मला सुटलेला नव्हता. बाकीचा चेहेरा मी कापडानें कसा तरी आच्छादूं शकलों असतों; पण नाकाचं कसं काय? नाकाच्या जागेवर रंगाचा जाड थर

द्यावा कीं काय असा अर्धवट विचार माझ्या मनांत येऊन गेला होता. पण पुठ्ठ्याचं बनवलेलं नकली नाकच हातांत आल्यावर आणखी काय पाहिजे होतं ?

"आतां एखादा केसांचा टोप मिळवावा का? आणि जाड भिंगांचा काळा चष्मा?

"पण खूप हिंडूनही गारेचे चष्मे कुठें सांपडेनात. पाय मात्र दुखायला लागले आणि अति श्रमांमुळें ग्लानि आली. शेवटीं मघाच्या पलंगावर जाऊन झोपलों.

"झोपतांना माझं मन पुष्कळच स्थिर झालं होतं. मला असं खात्रीपूर्वक वाटत होतं कीं सकाळीं इथून बिनबोभाट बाहेर पडणं आपल्याला फारसं कठीण नाहीं. डोक्याला एक पांढरा रुमाल गुंडाळून घ्यायचा, वाटेंत कुठें तरी काळा चष्मा विकत घ्यायचा—त्यासाठीं पैसे चोरलेले होतेच—आणि अशा रीतीनें आपला वेष पुरा करून हिंडायचं. मला स्वप्नंही तऱ्हेतऱ्हेचीं पडलीं. तो ज्यू घरमालक, ती मांजरवाली म्हातारी, तिचं हाडकुळं अदृश्य झालेलं मांजर, सारीं माझ्या स्वप्नांत चमकून गेलीं...आणि हळुहळू सगळींच अदृश्य झालीं....

"मी उठलों त्या वेळीं पहाट झाली होती. हवेंत गारठा होता.

"पहाटेचा मंद धूसर प्रकाश शटर-खिडक्यांच्या सांदींतून आंत झिरपत होता.

"मी उठून बसलों तेव्हां कांहीं क्षण आपण कुठें आहों तेंच माझ्या ध्यानांत येईना. हळुहळू मला सर्व गोष्टींची आठवण झाली आणि त्याच सुमाराला मला कुणाची तरी कुजबुज ऐकूं आली.

"दूर कुठच्या तरी विभागांत उज्ज्वल प्रकाश दिसत होता. दोन माणसं तिथें वावरत होतीं. त्यांनीं खिडक्या उघडून टाकल्या

होत्या आणि माझ्याच दिशेनें ते येत होते.

"मी ताडदिशीं पलंगावरून खालीं उडी टाकली. तो आवाज त्यांनीं ऐकला असावा अन् मला पुसट पाहिलंही असावं. कारण माझ्या अंगांत आतां कपडे होते.

★ ★ ★

## १७ व्यूह आणि प्रतिव्यूह

"मी कोणत्या भयंकर अवस्थेंत सांपडलों होतों तें आतां तुझ्या लक्षांत आलं ना ? आसरा तर मला नव्हताच. अंगावर वस्त्रही नव्हतं. त्यामुळें थंडीनें मी कुडकुडत होतों. भूकही सपाटून लागली होती आणि तरी कांहीं खाण्याचा धीर मला होत नव्हता. कारण खाल्लेलं जोंपर्यंत पचत नाहीं, रक्तांत मिसळत नाहीं तोंपर्यंत तें दिसायचीं भीति ! फारच विचित्र दृश्य दिसतं तें !"

"होय. हें माझ्या नव्हतं ध्यानांत आलं" केंप म्हणाला.

"माझ्या पण नव्हतं. शिवाय बर्फ पडायला लागलं तशा दुसऱ्याही अडचणी मला स्पष्ट दिसूं लागल्या. अंगावर बर्फाचे थर सांचले असते कीं माझी पांढरी शुभ्र आकृति सर्वांना स्वच्छ दिसली असती. पावसालादेखील मी भीत होतों. कारण अंगावर पाणी पडून पडून चकचक करणारी मनुष्याकृति दिसली असती. माणसाच्या आकाराचा बुडबुडा दिसला असता म्हण ना ! धुक्यानें किंवा दहिंवरानेंसुद्धा—इतकं स्पष्ट जरी नाहीं, तरी बरंच—दृश्यरूप मला दिलं असतं. भाबड्या लोकांनीं मला भूत ठरवलं असतं. याशिवाय लंडनच्या अनेक रस्त्यांतून हिंडतांना माझ्या पायांच्या

घोट्यांवर मातीचीं पुटं बसत चाललीं होतीं. अंगावरही ठिक-ठिकाणीं धूळ बसत होती. या सगळ्या कारणांमुळें अदृश्यांतून दृश्यांत मी कधीं येईन त्याचा नेम नव्हता.

" गल्ल्याकुच्यांतून हिंडत मी पुन्हा पोर्टलंड स्ट्रीटकडे गेलों. मीं लावलेली आग अजून धुमसत असलेली मला दिसली. ती बाजू टाळूनच मी चाललों. कारण तिकडे बरीच मोठी गर्दी जमलेली होती.

" आतां माझ्यापुढें पहिला प्रश्न होता तो म्हणजे कपडे मिळवण्याचा. त्याबद्दलच मी विचार करीत होतों, इतक्यांत एक लहानसं दुकान मला दिसलं. चाक्या, चॉकलेट, खेळणीं, नाताळांत घालायचे टोप, मुखवटे नि कृत्रिम नाकं सर्व कांहीं त्यांत मांडून ठेवलेलं होतं.

" तें पाहिल्याबरोबर माझ्या त्या कल्पनेनें पुन्हा जोर केला. लोकांची गर्दी टाळण्यासाठीं मुद्दामच वाकडीं वळणं घेत मी या रस्त्याच्या पिछाडीला गेलों. इथून डूरी लेन हें लंडनच्या नाट्य-सृष्टीचं केंद्र जवळ आहे हें मला माहीत होतं. नाटकाचे पडदे, पोशाख, सीनसीनरी ' विकत व भाड्यानें ' देणारीं कांहीं दुकानंही या भागांत आहेत असं मीं ऐकलं होतं. एका अरुंद बोळांत असलेलं असंच एक दुकान मीं गांठलं. दुकान ठेंगणं, कोंदट नि गलिच्छ होतं. इमारतीला वर आणखी चार मजल होते. मीं दुकानाच्या खिडकींतून पाहिलं तेव्हां आंत केसांचे टोप, मुगूट, चिलखतं, जिरटोप, जुनीं शस्त्रं नि नकली जरीचे आंगरखे वगैरे तऱ्हेतऱ्हेचा माल अस्ताव्यस्त पडलेला दिसला. दुकानांत कोणीच दिसलं नाहीं. मी मुकाट्यानें पायऱ्या चढून गेलों अन् दार ढकललं. तें उघडलं गेलं, पण त्याचबरोबर एक कर्कश घंटी करकरून वाजली.

मीं दार तसंच उघडं टाकलं नि आंत शिरून एका कोपऱ्यांत उभा राहिलों. मिनिटभर कोणीच आलं नाहीं. नंतर आंतल्या खोलींत कुणाच्या तरी जड पावलांचा आवाज ऐकूं आला. थोड्याच वेळांत आंतून एक मनुष्य बाहेर आला.

"जो माणूस बाहेर आला म्हणून सांगितलं तो बुटकेला, पाठीला किंचित् कुबड आलेला नि कपाळावर सत्राशें आंठ्या चढवलेला असा होता. त्याचे हात खूप लांबलचक होते; पण पाय मात्र आखूड नि वाकडे होते. त्याच्या अवतारावरून तो जेवतांना उठलेला दिसत होता. बाहेरच्या ओसरींत आल्यावर त्यानें एकदा चौफेर पाहिलं आणि कोणीच दिसलं नाहीं तेव्हां तो चांगला चकित झालेला दिसला. मग चिडल्यासारखं करून 'मस्तवाल कारटीं' असं कांहीं तरी बडबडला, दाराशीं आला, बाहेर रस्त्यावर डोकावून पाहिलन्, पुन्हा आंत आला, एक लाथ मारून दार बंद केलन् आणि कांहीं तरी पुटपुटत आंत निघून गेला.

"मी त्याच्या मागोमाग गेलों. मी अगदीं मांजराच्या पावलांनीं जात होतों तरी त्याला माझी चाहूल लागली अन् थबकून तो मागें पाहूं लागला. त्याचे कान इतके तिखट होते कीं मी खरोखर थक्क झालों. आंतला दरवाजा त्यानें धाडकन् बंद केला. त्यामुळें मला तिथेंच थांबावं लागलं.

"मी तिथेंच घुटमळत उभा होतों, इतक्यांत त्यानें पुन्हा दार उघडलं. अजून त्याचं समाधान झालेलं नसावं. कारण फिरून एकदा दुकानांत हिंडून त्यानें नीट पाहणी केली. काउंटरच्या मागें कोनाकोपऱ्यांतून नीट पाहिलं. मग तसाच साशंक स्थितींत तो थोडा वेळ उभा राहिला. दरम्यान आंतलं दार त्यानें उघडंच

टाकलं होतं. त्यांतून मी चटकन् आंत शिरलों.

"अगदीं लहानशी नि दरिद्री अशी ती खोली होती. मोठं सामान असं तिथें थोडंच होतं. कोपऱ्यांत मुखवट्यांचा एक ढीग पडला होता. टेबलावर अर्धवट खाल्लेले पदार्थ होते. थोड्याच वेळानें तोही आंत आला अन् टेबलाशीं चरत बसला. त्याची ती खादाडी मी दूर उभा राहून नुसता पहात होतों. खोलीला तीन दरवाजे होते; पण तिन्ही बंद ! मुकाट्यानें उभं राहाण्याशिवाय इलाज नव्हता. दरम्यान अंगांत हुडहुडी भरली होती. आतां शिंक येते कीं मग असं झालं होतं. तो खवीस तर सारखा कान टवकारून इकडे तिकडे पहात होता.

"एकदाचा त्याचा तो उदरंभरणाचा कार्यक्रम संपला अन् चहाचीं भांडीं नि पावाचे उरलेले तुकडे हें सगळं एका ताटांत भरून तें ताट त्यानें दरवाजांतून आंत चालवलं. हातांतल्या वजनामुळें त्याला या वेळीं दार लावतां आलं नाहीं. नाहीं तर तें लावायला पठ्ठ्या विसरला नसता ! मी चटकन् त्याच्या मागोमाग आंत गेलों. तिथें खालीं जाण्याचा जिना होता; त्या जिन्यानें तो तळघरांत चालला आणि मीही त्याच्या मागें चाललों.

"मधल्याच एका पायरीवर तो थबकला. मागें वळून त्यानें थेट माझ्या अंगांतून पलीकडे पाहिलं, कानोसा घेतला. तो स्वतःशीं पुटपुटला, 'मला नक्की वाटतं—' आपल्या लंबाड्या केसाळ हातानें त्यानें खालचा ओठ ओढला, सूक्ष्म नजरेनें जिन्याची संपूर्ण टेहेळणी केली, मग स्वतःशींच कांहीं तरी गुरगुरला आणि पुन्हा पायऱ्या उतरूं लागला. तळघराचं दार उघडण्यापूर्वीं पण असाच तो थांबला. त्याची मुद्रा गोंधळल्यासारखी पण संतप्त दिसत होती. आपल्या जवळपास कांहीं तरी

खसखस होते आहे अशी जबर शंका त्याला आली होती खास!

"केंप, त्याच्या या संशयी वर्तनाची मला इतकी चीड आली, कीं शेवटीं तेवढ्यामुळेंच संतापून मीं त्याच्या टाळक्यावर रट्टा हाणला झालं!"

"टाळक्यावर?" केंप स्तिमित होऊन उद्गारला.



"होय. तो जिन्यावरून उतरत असतांना एक स्टूल घेऊन त्याच्या डोक्यांत हाणलं. तो पायऱ्यांवरून खालीं गडगडला— एखादं भांड्यांचं पोतं पडावं तसा!"

"पण ग्रिफिन!—मांणुसकीचे साधे नियम—शिष्टाचार—"

"ते साध्या लोकांसाठीं असतात. केंप, तूं एवढं लक्षांत ठेव कीं काय वाटेल तें करून मला पोशाख घालून तिथनं बाहेर पडणं भाग होतं. इतकंच नुसतं नाहीं, तर मी बाहेर पडतांना

या राक्षसाला दिसणं म्हणजेही संकटांत उडी घेतल्यासारखं झालं असतं. तेव्हां त्याला मूर्च्छित पाडला हेंच ठीक झालं. त्याची शुद्ध गेल्याबरोबर त्याच्या तोंडांत पहिल्यानें एक गंजीफ्रॉक कोंबला अन् एका मोठ्या चादरीनें त्याचे हातपाय बांधून टाकले—"

कॅंप म्हणाला, "विसावं शतक, इंग्लंडसारखा देश—अन् इथें एका गरीब माणसाच्या स्वतःच्या घरांत शिरून तूं त्याला लुटतोस!"

"लुटतों?" अदृश्य माणूस चिडून बोलला. "तूं तर मला आतां चोर ठरवायला लागलास, कॅंप! मी कोणत्या अवस्थेंत होतों याचा तूं विचार कर जरा—"

"केला. अन् त्याच्याही अवस्थेचा केला!"

अदृश्य माणूस एकाएकीं ताठ उभा राहिला. "काय म्हणतोस?" तो कठोर सुरांत म्हणाला.

"खरं तेंच म्हणतों" कॅंपच्याही आवाजांत कठोरता येत चालली. पण तेवढ्यांत त्यानें संयम केला आणि म्हटलें, "अर्थात् तूं चांगलाच कात्रींत सांपडलेला होतास हें मी कबूल करतों."

"कात्रींत म्हणजे काय? भयंकरच कात्रींत. तें कुबड्याचं पिशाच्च माझ्या जवळजवळ मानगुटीवरच बसलं होतं आणि तो जसा कांहीं मुद्दामच मला चिंथवत होता. अशा वेळीं मी चिडलों तर त्याबद्दल तूं मला दोष देशील, कॅंप?

"मी कुणालाच दोष देत नसतों" कॅंप म्हणाला. "दोष देण्याची फॅशन आतां जात चालली आहे. पण तूं पुढं काय केलंस?"

"मला खूप भूक लागलेली होती. तेव्हां आधीं खालीं जाऊन मीं खाद्यपदार्थांवर ताव मारला. नंतर कपड्यांच्या खोलींत गेलों.

खिडकीचा पडदा जरा सारून बाहेर पाहिलं तों चांगला चक्क प्रकाश दिसला. त्या मानानें या कुबट जागेंत किती अंधार होता! बाहेर गाड्यांची नि पायीं फिरणारांची वर्दळ सुरू होती. आंत जुनापुराणा रद्दी माल काळोखांत कुजत पडला होता. पुन्हा मीं पडदा बंद केला नि आंत वळलों.

"बऱ्याच वेळानंतर माझी पोशाखाची निवड पुरी झाली. एक लहान प्रवासी बॅग दिसली तीही मीं लुंगावली. तोंडाला फासायचा रंग, पावडर नि गम हींही बॅगमध्यें भरून घेतलीं.

"चेहेऱ्याचा जेवढा भाग दिसणं जरूरीचं आहे तेवढा सपाटून रंगवून घ्यावा असा माझा प्रथम विचार होता. पण तें फारसं सोयीचं नव्हतं. कारण त्याला वेळही फार लागला असता अन् फिरून अदृश्य व्हायची पाळी आली कीं टर्पेन्टाइन लावून तो रंग काढतां काढतां नाकीं नऊ आले असते. तेव्हां शेवटीं मीं एक नकली नाकच निवडून घेतलं. जरा विचित्रच होतं तें. पण किती लोकांचीं नाकं मोठीं सुंदर असतात? सुदैवानें काळा चष्माही मला मिळाला. तो, पांढुरके कल्ले आणि एक केसांचा टोप अशी वेषभूषा मीं केली. आंतून घालायचे गंजीफ्रॉक, चड्डी वगैरे कपडे मला मिळाले नाहींत; पण ते मी नंतर विकत घेऊं शकलों असतों. तूर्त मीं एक पायघोळ शर्ट नि पाटलोण घातली अन् गळ्याभोवतीं मोठा थोरला मफलर गुंडाळला. कातडी हातमोजे मिळाले, पण पायमोजे मिळाले नाहींत. तेव्हां कुबड्याचे बूट—मोठेच होत होते ते—तसेच पायांत चढवले. बुटांचा वरचा भाग नि पाटलोणीची किनार यांमध्यें शक्य तों अंतर राहूं नये असं केलं. दुकानांतल्या डेस्काचा खण उघडला. त्यांत तीन सोन्याचे सॉवरीन अन् तीस चांदीचे शिलिंग निघाले ते खिशांत घातले.

आंतल्या खोलींतलं कपाट फोडलं. त्यांत आठएक पौंड सोनं होतं तेंही खिशांत घातलं. आणि आतां निघणार, तोंच मनांत शंका आली—खरोखरच आपण ठीक दिसतों आहों ना ? एक लहानसा आरसा मला सांपडला होता त्यांत निरखून पाहिलं, वेगवेगळ्या कोनांतून पाहिलं. यत्किंचित् दोष मला आढळेना. अर्थात् मी नाटकी सोंग दिसत होतों यांत शंका नाहीं. पण सोंग असलों—अगदीं हसण्याजोगा असलों, तरी अशक्यप्राय वाटण्यासारखं माझ्यांत कांहीं नव्हतं.

"मला पुष्कळच धीर आला अन् दुकानाचं पुढचं दार उघडून मी रस्त्यावर उतरलों. आतां त्या कुबड्याचं कांहीं का होईना, मला त्याची प्रर्वा नव्हती.

"पांच मिनिटांत दहाबारा वळणं घेऊन मी दुकानापासून बराच दूर गेलों. माझ्याकडे विशेष लक्ष असं कुणींच दिलं नाहीं. अशा रीतीनें एका महान् संकटांतून पार पडल्यासारखं मला वाटायला लागलं."

अदृश्य माणूस मध्येंच थांबला.

केंपनें विचारलें, "त्या कुबड्याबद्दल कांहीं—कांहींसुद्धा विचार तुझ्या मनांत आले नाहींत ?"

"कशाला येतील ? अजूनसुद्धा तो जिवंत आहे का मेला हें मला माहीत नाहीं. अर्थात् मरायला झालंय् काय त्याला म्हणा ! त्यानें स्वतःला सोडवून घेतलं असेल कसं तरी. पण गांठी मात्र मीं पक्क्या बांधल्या होत्या."

जरा वेळ तो कांहीं बोलला नाहीं. खिडकीजवळ गेला आणि बाहेर पहात राहिला.

"पुढें काय झालं ?

" भूक लागली होती. पहिल्यानें एक हॉटेल गांठलं अन् सबंध जेवणाची ऑर्डर देणार तोंच आठवण झाली....खायचं म्हणजे तोंड उघडावं लागणार अन् आंतला काळोख सर्वांना दिसणार. आपलं अदृश्यपणाचं गुपित फुटणार ! छे ! नकोच तें. तोंडाला सुटलेलं पाणी चाटत मी वेटरला म्हणालों, 'मी आलोंच आत्तां दहा मिनिटांत' आणि तिथून सूंबाल्या केला. भुकेनें कावलों होतों, जिकडे तिकडे खमंग अन्नाचा वास सुटला होता, पण मी मात्र कांहीं खाऊं शकत नव्हतों. केंप, तुझी झाली आहे कधीं माझ्यासारखी स्थिति?—शेवटीं तावातावानें तसाच एका हॉटेलांत शिरलों नि म्हणालों, 'मला स्वतंत्र खोली पाहिजे. मला....अपघात झाला नि त्यांत चेहेरा बराच विद्रूप झालाय्.' हॉटेलमधले लोक माझ्याकडे चौकस दृष्टीनें पहायला लागले, पण त्यांनीं कांहीं प्रश्न विचारले नाहींत. मला एकदाचं स्वतंत्र खोलींत जेवण मिळालं. आणि भरपूर पोटपूजा झाल्यावर एक भला मोठा चिरूट पेटवून मी माझे पुढचे बेत आंखीत बसलों. बाहेर त्या वेळीं बर्फाच्या वादळाला सुरवात झाली होती.

"केंप, मी जितका जास्त जास्त विचार करूं लागलों तितकं मला जास्त जास्त पटायला लागलं कीं अदृश्य माणूस म्हणजे निव्वळ आचरटपणा आहे. विशेषतः थंडीच्या दिवसांत अन् लंडनसारख्या सुधारलेल्या शहरांत त्याच्यासारखा असहाय प्राणी दुसरा सांपडायचा नाहीं. त्या दिवशीं तरी मी स्वतःबद्दल अगदीं पूर्णपणें निराश होतों. अदृश्यतेमुळें बऱ्याचशा चांगल्या चांगल्या गोष्टी आपण कुणालाही न भितां हस्तगत करूं शकूं हें खरं; पण पुढें काय? त्या वापरायच्या कशा? आणि ज्या वेळचा त्या वेळीं एखादा जिन्नस वापरतां आला नाहीं, तर त्याचा उपयोग काय? म्हणजे

एवढा सगळा उपद्व्याप करून मी जो कपड्यांत गुंडाळलेलं एक बुजगावणं बनलों तो कशासाठीं ? राजकीय महत्त्वाकांक्षे-साठीं ? नांवलौकिकासाठीं ? छे, मला या गोष्टींची तर कधींच दिक्कत वाटली नव्हती. मग...."

ग्रिफिन थांबला. पुन्हा एकदा त्याची नजर खिडकीबाहेर लागली होती.

केंप स्वतःशीं म्हणाला, 'कुठून तरी याला बोलत ठेवलं पाहिजे....'

"कुठें तरी परदेशांत जावं असा माझा पहिला बेत होता. पण चुकून तुझ्या घरांत मी शिरलों अन् तेव्हांपासून माझ्या सगळ्या बेतांना कलाटणी मिळाली. कारण केंप, तूं हें सगळं समजूं शकतोस. झालं तें वाईट झालं हें खरं, जी प्रसिद्धि मिळाली ती मिळायला नको होती हेंही खरं, माझ्या बहुमोल वह्या गमा-वल्या हेंही खोटं नाहीं. तरी पण केंप, मला असं वाटतं, कीं— कीं केवढं मोठं क्षेत्र माझ्यापुढें खुलं आहे—"

मध्येंच तो थांबला आणि एकदम म्हणाला, "मी इथें आहें हें तूं कुणाजवळ बोलला तर नाहींस ना ?"

केंपनें एकदम उत्तर दिलें नाहीं. क्षणभरानें तो म्हणाला, "हें का सांगायला पाहिजे ?"

"कुण्णा—कुण्णाजवळ ?"

"अं हं !"

"ठीक. आतां—" असें म्हणत म्हणत अदृश्य माणूस उभा राहिला. त्यानें कंबरेवर हात ठेवले आणि मग तो खोलींत येरझारा घालूं लागला.

"केंप, मीं एक मोठी प्रचंड चूक केली. ही भानगड मीं

एकट्यानें करायला नको होती. माझी शक्ति, किती तरी वेळ अन् सुसंधि मीं यापायीं फुकट घालवलीं. माणसाला जगांत एकट्यानें करतां येण्यासारखं फारसं कांहीं नाहींच, केंप! तो फार तर एखादी क्षुल्लक चोरी करूं शकेल, कुणाला तरी मामुली इजा करूं शकेल. पण संपलं! त्यापेक्षां जास्ती एकटा माणूस काय करणार!....केंप, मला एक मदतनीस हवा आहे, रक्षक हवा आहे, मला लपायला जागा हवी आहे. मला झोपायला मिळालं पाहिजे, खायलाप्यायला नि विश्रांति घ्यायला मिळाली पाहिजे. या सगळ्यासाठीं मला कुणी तरी साथीदार हवा आहे. म्हणजे मी हजारों गोष्टी करूं शकेन. खुनांचं सत्र सुरू करीन!"

बोलतां बोलतां तो थबकला. "श्! कसला आवाज झाला रे तो खालीं?"

"कांहीं नाहीं, कांहीं नाहीं—" केंप घाईघाईनें म्हणाला. "ग्रिफिन, मला हें मुळींच पसंत नाहीं—अगदीं बिलकुल पसंत नाहीं. सबंध मानवजातीविरुद्ध तुझा हा राक्षसी खेळ आहे—तो कशासाठीं? तुला त्यांत काय सुख मिळणार आहे? त्यापेक्षां सगळ्यांना विश्वासांत घे. तुझे काय जे शोध आहेत ते जगापुढें मांड. निदान आपल्या राष्ट्राला तरी कळूं देत ते. एकच साथीदार कशाला, लक्षावधि साथीदार मिळव—"

अदृश्य माणसानें केंपला जास्त बोलूं दिलें नाहीं. एक हात पुढें करून तो म्हणाला, "पावलं वाजताहेत. कुणी तरी वर येतं आहे—"

"छट्!"

"छट् कसं ? मीच पहातों—" आणि असें म्हणून हात तसाच पुढें करून अदृश्य माणूस दरवाजाच्या अगदीं जवळ जाऊन पोचला.

* * *

## १८ शोधाशोध

आणि मग पुढला प्रकार एवढ्या झपाट्यानें घडला कीं ज्याचें नांव तें ! .

केंप एक क्षणभरच थबकला असेल. मग एकदम पुढें होऊन त्यानें ग्रिफिनला अडवलें. ग्रिफिन चमकला. स्तिमित होऊन जागच्या जागीं उभा राहिला.

"दगलबाज !" तो ओरडला. त्याच्या ड्रेसिंग गाऊनचीं बटनें ताडताड तुटूं लागलीं. डोळ्याचें पातें लवतें न लवतें तों अदृश्य माणसानें जमिनीवर बैठक मारली होती आणि अंगांतले कपडे भराभर काढून तो दूर फेकीत होता.

केंपनें तीन उड्यांत दरवाजा गांठला. ग्रिफिननें तीव्र सुरांत ओरडत एक उंच उडी मारली. त्याचे पाय तेवढ्यांत दिसेनासे झाले होते. केंपनें खाडदिशीं दरवाजा उघडला. त्याबरोबर खालच्या मजल्यावर धावपळ चालल्याचा आवाज ऐकूं आला.

केंपनें चपळाईनें अदृश्य माणसाला दूर ढकललें, स्वतः उडी मारून दाराबाहेर आला आणि त्यानें धाडदिशीं दार बंद केलें.

किल्ली बाहेरच्याच बाजूला असणार. ती एकदा फिरवली कीं अदृश्य माणूस बंदिवान होणार !

पण दुर्दैव ! किल्ली बाहेरच्या बाजूला नव्हती. ती आंतल्या बाजूला अडकवलेली होती आणि दार आपटल्याबरोबर ती खोलींत पडल्याचा आवाज केंपनें बाहेर ऐकला, आणि त्याच्या काळजांत चर्र झालें. दोन्ही हातांनीं दरवाजाची कडी घट्ट धरून दरवाजा ओढण्याचा त्यानें प्रयत्न केला. तेव्हां तो ओढला जाऊन पांच सहा इंचांची फट दिसूं लागली. पण ती फटकन् मिटली. दुसऱ्या वेळेला पुन्हा दरवाजा उघडला. चांगली एक फुटाची फट मिळाली, पण तिचा फायदा केंपला मिळण्यापूर्वी अदृश्य माणसानेंच आंत ड्रेसिंग गाऊनचा बोळा कोंबला. त्याचा काय विचार आहे हें केंपच्या लक्षांत येण्यापूर्वीच अदृश्य माणसाचीं बोटें येऊन केंपच्या गळ्यावर दाबलीं गेलीं. स्वतःचा जीव वांचवण्यासाठीं केंपनें आपसूकच दारावरचा हात काढला. दुसऱ्याच क्षणीं तो इतक्या जोरानें मागें ढकलला गेला कीं त्याला कांहीं करणेंच शक्य नव्हतें. तें ड्रेसिंग गाऊन त्याच्या मागोमाग सपाट्यानें आलें आणि त्यानें केंपचें सर्वांग झाकून टाकलें.

एव्हांना बरडॉक गांवचा कोतवाल कर्नल अॅडी अर्धा जिना चढून आला होता. केंपचें पत्र त्याच्या हातांतच होतें. वर आल्याबरोबर केंपची दुर्दशा पाहून तो हतबुद्ध होऊन तसाच उभा राहिला. लगेच दुसरेंही एक विलक्षण आश्चर्य त्याच्या नजरेला पडलें. तें म्हणजे नुसत्या कपड्यांचा अधांत्रीं चाललेला नाच !

केंपची गठडी उलगडली, तो धडपडत उठला, पुन्हा खालीं पडला, आपटला, आणि—थाड, थाड—

आणि मग अचानक वज्राघात व्हावा तसें कोतवालाला झालें. कुठून तरी त्याला एक जबरदस्त तडाखा बसला. प्रचंड बोजा आपल्या अंगावर आदळल्यासारखें त्याला वाटलें. अदृश्य बोटांनीं त्याचें नरडें दाबलें, त्याला खालीं रेटलें, अदृश्य ढोपरानें त्याच्या छातींत ढुशी दिली. आणि अशा वेगानें कोतवाल मागें फेकला गेला कीं हें काय होत आहे तें त्याच्या ध्यानांत येईतों जिन्यावरून गडगडत तो खालपर्यंत पोचला होता. जरा वेळानें जिन्यावर दडदड पाय वाजताहेत, जवळजवळ येताहेत असें त्याला वाटलें. दुसऱ्याच क्षणीं एक अदृश्य लाथ त्याच्या छाताडांत बसली. अदृश्य माणूस त्याच्या अंगावरून पलीकडे गेला. बाहेरच्या दालनांत दोघे हवालदार होते त्यांनीं बोंब मारलेली कोतवालसाहेबांनीं ऐकली. बाहेरचा दरवाजा उघडून खाडदिशीं आपटलेला त्यांनीं ऐकला.

कोतवालसाहेब उठून बसले आणि विस्फारित नेत्रांनीं समोर पाहूं लागले.

जिन्यावरून केंप अडखळत खालीं येत होता. कपडे विस्कट-लेले, त्यांवर धूळ बसलेली, एका गालफडांत रट्टा बसल्यामुळें चेहेरा पांढरा फिक्कट बनलेला, ओठांतून रक्त वाहात असलेलें, हातांत गुलाबी ड्रेसिंग गाऊन व दुसरे असेच कांहीं तरी कपडे धरलेले असा त्याचा अवतार होता.

"बाप रे!" केंप कठड्यावर रेलून स्वतःला सावरीत ओरडला. "पळाला शेवटीं—पळाला!"

  

विद्युद्वेगानें घडलेल्या या गोष्टी कर्नल ॲडीच्या मेंदूंत उतरवणें सुद्धा केंपला फार कठीण गेलें. त्याची बोबडीच वळल्यासारखी झाली होती; आणि तोंडांतून जे उद्गार निघत होते ते अस्फुट, संदिग्ध होते. बऱ्याच वेळानें त्यांचा अर्थ कोतवालसाहेबांना कळला.

केंप म्हणत होता, "हा माणूस जसा अदृश्य आहे तसाच पिसाट आहे—भयंकर माथेफिरू आहे. आज तो जें कांहीं बोलला तें शहारे आणणारें आहे. विलक्षण क्रूर अशी त्याची महत्त्वाकांक्षा आहे....त्याच्याच इतका नंगा असा त्याचा स्वार्थ आहे....आतांपर्यंत त्यानें कितीक लोकांवर हल्ले करून त्यांना घायाळ केलं आहे आणि त्याला जर आपण रोखलं नाहीं तर कितीकांचे तो खून पाडील! महाभयंकर दुष्ट माणूस आहे तो—कोतवालसाहेब, काय वाटेल तें करून त्याला पकडाच!"

कर्नल ॲडींनीं मान डोलावली. "त्याला पकडलं तर पाहिजेच."

"पण कसं?—" केंप ओरडला. "कसं पकडणार तुम्ही त्याला?....थांबा, थांबा—मी सांगतों. ताबडतोब कामाला लागा! ....तुमच्याजवळ असतील तेवढे शिपाई आणा. कांहीं झालं तरी या जिल्ह्याबाहेर त्याला जाऊं देऊं नका. एकदा तो पळाला कीं सबंध देशभर धिंगाणा घालील. भीतीचं साम्राज्य त्याला पसरायचं आहे. गुप्त पोलीस धाडा!....सगळ्या आगगाड्या-आगबोटींचे कोपरेन् कोपरे धुंडा. सैन्याची मदत घ्या, आरमाराची मदत घ्या! तारा करा, टेलिफोन करा! एकाच गोष्टीसाठीं तो इथें थांबण्याची शक्यता आहे. त्याच्या कांहीं महत्त्वाच्या टिप्पणवह्या एकानें लांबवल्या आहेत, त्या त्याला परत मिळवायच्या आहेत. इथल्या पोलीस चौकीवर एका इसमाला ठेवलेलं आहे, बघा—मार्व्हेल नांवाच्या!"

" माहीत आहे " ॲडी म्हणाला.

" बस्स तर. त्याची झडती घ्या नीट. दुसरं असं, कीं या माथेफिरूला खायला मिळणार नाहीं, झोपायला मिळणार नाहीं असं करा. रात्रंदिवस त्याच्यावर जागता पहारा ठेवला पाहिजे. अन्न—सगळं सगळं अन्न कुलपांत ठेवा, म्हणजे त्याला कुलपं फोडणं भाग पडेल अन् मग तो लवकर सांपडेल! दारं-खिडक्या बंद करा. कुठेंही त्याला थारा मिळणार नाहीं असं करा! देव करो नि खूप गारठा पडो! बर्फ पडो! पाऊस पडो! म्हणजे अदृश्य माणूसच काय, त्याचा बाप सांपडेल आपल्याला!"

" आणखी काय काय करूं सांगा " ॲडी म्हणाला. " मी आत्तांच्या आत्तां जातों नि तयारीला लागतों. पण केंप, तुम्हीसुद्धा चला आमच्याबरोबर. आपण एक युद्धमंडळच तयार करूं या— चला चला! मग वाटेंत सांगा मला तुमच्या आणखी कांहीं कल्पना असल्या तर. "

ॲडी व केंप खालीं येऊन पोचले तों बाहेरच्या उघड्या दरवाजांत उभे राहून दोघे पोलीस शिपाई अंतराळांत पहात होते! त्यांतला एकजण म्हणाला, " साहेब, तो कसा पळाला कळत नाहीं ! "

कर्नल ॲडी म्हणाला, " आपण पहिल्यानें ठाण्यावर जाऊं या. जा रे, एक गाडी घेऊन ये. आणि तूं—तूं इथेंच राहा आम्ही कळवीपर्यंत—केंप, आणखी काय करूं ? "

केंपनें एक नवीन कल्पना सांगितली, " कुत्रे ! कुत्र्यांचा उपयोग करा. आपल्यापेक्षां तेच लवकर त्याचा शोध लावतील. "

" ठीक आहे. कुत्रे सोडूं या ! मला एक ब्लडहाऊंडची जोडी माहीत आहे, ती मागवतों.—पुढें ? "

"आणखी एक ध्यानांत ठेवा" केंप म्हणाला. "अन्न खाल्ल्या-वर पचेपर्यंत तें अदृश्य होऊं शकत नाहीं. म्हणजे जेवणानंतर लपून राहाण्याशिवाय त्याला इलाज नसतो. गांवाबाहेरचीं झाडं-झुडपं, वळचणीच्या जागा, सर्व झोडपून काढा. तसंच हत्यारं—हत्यारं सगळीं लपवून ठेवा....कडीकुलपांत ठेवा ! नुसतीं हत्यारंच नाहीं, तर दगडधोंडे—वाटेंत जें जें कांहीं मारण्यासारखं सांपडेल तें."

"ठीक आहे. तेंही जमेल तेवढं करतों."

"रस्त्यांवरून—" केंपनें आपली नवी सूचना अर्ध्यावरच सोडली. त्याला काय वाटलें, कुणास ठाऊक !

"रस्त्यांवरून काय ?"

"कांचेची पूड पसरा !....निर्दयपणाची सूचना आहे खरी; पण निर्दय, अमानुष माणसाशीं गांठ आहे हें लक्षांत ठेवा. आणि मोकळा सुटला तर तो काय काय करील त्याचं चित्र डोळ्यांपुढें आणा."

"स्स्—" शहारे आल्यासारखें करून ॲडी म्हणाला. "मलाही ही कल्पना कशीशी वाटते. पण कांचेची पूड तयार ठेवतों मी. तो जर आटोक्याबाहेर गेला—"

"आटोक्याबाहेर ?" केंप सात्त्विक संतापानें ओरडला. "कर्नल-साहेब, मी तुम्हांला सांगतों, तो आटोक्याबाहेर गेला तर हत्याकांड सुरू करील. माझा शब्द म्हणजे दगडावरची रेघ समजा. आपल्या हातीं एवढंच आहे, कीं त्याच्या आधीं आपण आपलीं प्यादीं सरकवायचीं. सध्या तरी तो भयंकर क्रुद्ध झालेला आहे. शांत होऊन आपले बेत आंखायला त्याला थोडा वेळ लागेल. तेवढ्यांत आपण त्याचा समाचार घेतला पाहिजे. मानव जातीवर उलट-

लेला राक्षस आहे तो. त्याचं आतां कांहीं बरंवाईट झालं तर त्याची जबाबदारी त्याच्याच शिरावर आहे!"

केंपच्या घरांतून अदृश्य माणूस बाहेर पडला तो क्रोधांध होऊनच. फाटकापाशीं एक लहान मूल खेळत होतें, तें आडदांडपणें उचलून बाजूला फेकलें गेलें. त्याच्या पायाचें हाड मोडलें म्हणतात. त्यानंतर कांहीं तासपर्यंत अदृश्य माणसाच्या हालचालींचा कुणालाही पत्ता नव्हता. कल्पनाच लढवायची म्हटलें तर तो बहुधा दुपारच्या त्या टळटळीत उन्हांत समोरची टेकडी चढून गेला असावा. नंतर पलीकडे—पोर्ट बरडॉक गांवाच्या पिछाडीला—मोकळ्या मैदानांत, मधून मधून जीं झुडपें उगवलेलीं आहेत त्यांत कुठें तरी पडून त्यानें आपल्या नशिबावर आग पाखडली असावी. तिथेंच आपला तापलेला मगज त्यानें शांत केला असावा.

तेंच ठिकाण त्यानें आसऱ्यासाठीं निवडलें असावें याला सबळ पुरावा नंतर मिळाला. दुपारीं दोनच्या सुमाराला त्यानें आपलें अस्तित्व गाजवलें—पण तें गाजवण्याचा प्रकार मात्र हिडीस होता.

दोन वाजेपर्यंतचा वेळ त्यानें कोणत्या मनःस्थितींत घालवला आणि काय काय मनसुबे रचले त्याची मात्र केवळ कल्पनाच करणें आपल्या हातीं आहे. केंपच्या 'दगलबाजी'मुळें तो भयंकर संतापला होता यांत शंका नाहीं. आणि केंपचा उद्देश कितीही चांगला असला, तरी आपल्या पाहुण्याच्या अपेक्षांना त्यानें जो अकल्पित धक्का दिला त्यामुळें अदृश्य माणसाबद्दल आपल्यालाही थोडीफार अनुकंपा वाटणें साहजिक आहे. आपल्या कामांत केंप आपल्याला साथ देईल असा त्याचा ग्रह झाला होता तो एकदम कोलमडून पडला आणि त्यामुळें उद्वेग, निराशा नि संतापाच्या

भरांत तो जो पळाला तो पळालाच.

दोन वाजेपर्यंत तो कदाचित् स्वस्थ बसला असेल, पण बाकीची मानवजात स्वस्थ बसली नव्हती. पोर्ट बरडॉकच्या पंचक्रोशींत अदृश्य माणसाच्या शोधार्थ मोठी मोहीम सुरू झाली होती. सकाळीं त्याच्याबद्दल नुसत्या वदंता होत्या. आतां लोक गंभीर, भयभीत बनले होते आणि याला कारण केंपनें परिस्थितीचें गांभीर्य समजावून देणारा जाहीरनामाच काढला होता. पोलिसांनीं ठिकठिकाणीं पत्रकें चिकटवलीं होतीं. पत्रकांतल्या सूचना वाचून जो तो 'हुश्शार' बनला होता. अदृश्य माणसाला हुडकून काढण्यासाठीं टोळक्या-टोळक्यांनीं लोक बाहेर पडले होते. दोन वाजेपर्यंत त्याला कदाचित् आगगाडींत बसून पळून जातां आलें असतें.



पण आतां तें अशक्य होतें. कारण जवळच्या सर्व स्टेशनांतून जाणाऱ्या आगगाड्या आतां सैनिकी बंदोबस्तांत जात होत्या. त्यांच्या सर्व दारांना आतां कुलपें ठोकलेलीं होतीं. मालगाड्यांची

वाहतूक अजिबात बंद केली होती. आणि पोर्ट बरडॉक गांवच्या सभोवतीं वीस मैलांच्या टापूंत बंदुका नि लाठ्या घेतलेले शिपाई, सैनिक व साधे नागरिक गस्त घालीत होते. मिळाले तेवढे कुत्रेही त्यांनीं बरोबर घेतले होते आणि झाडझुडुप, गवत, कचऱ्याचे ढीग हीं सगळीं झोडपून काढण्याचा कार्यक्रम सुरू होता. प्रत्येक कोनाकोपऱ्यांतून नि प्रत्येक आडोशाच्या जागीं काठीनें ठोसून पहाण्याचा कोतवालसाहेबांनीं हुकूम दिला होता. तो पार पाडतांना कांहीं शेंदाड शिपायांची जी तिरपीट उडत होती ती बघण्यासारखी होती. एकंदरींत अदृश्य माणसानें हजारों लोकांच्या वस्तीला हादरून सोडलें होतें यांत शंका नाहीं.

हत्यारबंद घोडेस्वारही गल्ल्याकुच्यांतून रपेट करीत होते. प्रत्येक घरापाशीं थांबून लोकांना ते ताकीद देत होते–'तुमच्याजवळ हत्यारं असतील तर तीं परजून तयार राहा. नाहीं तर दारं-खिडक्या तरी बंद करा.' दुपारीं तीन वाजतांना शाळांना सुट्टी देण्यांत आली आणि बिचारीं भेदरून गेलेलीं मुलें जमावानें घरीं जाऊं लागलीं.

पोलीस बंदोबस्त इतका जलद आणि कडक होता, आणि लोकांनाही आतां अदृश्य माणसाची इतकी दहशत बसली होती, कीं रात्र पडेपर्यंत बरडॉक आणि आसपासचा शेंकडों मैलांचा टापू म्हणजे एक तटबंदीचें ठाणें बनलें. आणि रात्रीच्या काळोखाबरोबरच एक नवीन भयानक वार्ताही सर्वत्र वाऱ्यासारखी पसरली.

मि. विकस्टीड यांचा खून झाला होता.

★ ★ ★

# दंड थोपटले !

अदृश्य माणसानें पोर्ट बरडॉकच्या पिछाडीला जें माळरान आहे, त्यांत कुठें तरी आराम केला असावा असा आपण तर्क केलाच आहे. तो खरा मानला तर दुपारीं बारानंतर केव्हां तरी उठून तो पुन्हा आपल्या मोहिमेवर निघाला असावा. त्याच्या मनांत काय होतें कुणास ठाऊक, पण जो काय बेत त्यानें रचला असेल तो पार पाडण्यासाठीं एखाद्या हत्याराची जरुरी त्याला भासली असावी. कारण विकस्टीडची नि त्याची गांठ पडण्यापूर्वी त्याच्या हातांत लोखंडी गज होता असें मानायला भरपूर पुरावा आहे.

त्यांची 'गांठ' पडली म्हणजे काय झालें, ते हमरीतुमरीवर कसे आले वगैरे कांहींच कळायला मार्ग नाहीं. एवढें खरें, कीं लॉर्ड बरडॉक यांच्या बंगल्यापासून दोनशें यार्डांवर जे मुरूम-रेतीचे खड्डे आहेत, त्यांच्या कांठावर हा प्रकार घडला. त्या ठिकाणीं जमीन इतकी ठोकरली गेली होती, आणि विक-स्टीडच्या अंगावर इतक्या जखमा होत्या नि त्याच्या काठीचे इतके तुकडे झाले होते कीं चांगलाच प्रतिकार केल्याशिवाय तो मेला असेल हें शक्य दिसत नाहीं. तरी पण त्याच्यावर अदृश्य माणसानें हल्ला कां केला तें कोडें अजून सुटलेलें नाहींच. कोणी म्हणतात, निव्वळ माथेफिरूपणा हेंच त्याचें कारण. तेंच जास्त शक्य दिसतें. कारण विकस्टीड हा सुमारें पंचेचाळीस वर्षांचा अगदीं शांत, गरीब स्वभावाचा मनुष्य होता. लॉर्ड बरडॉक यांच्याकडेच तो नोकरीला होता. जन्मांत त्यानें कधीं मुंगीलाही दुखावल्याचें कुणीं ऐकलें नव्हतें. अदृश्य माणसासारख्या भयंकर प्राण्याला चिथावण्याचें धाडस तो कधीं करील यावर कुणाचाही

विश्वास बसणें अशक्य होतें. आणि असल्या माणसावर अदृश्य माणसानें लोखंडी गजानें हल्ला केला! शेजारच्याच एका तारेच्या कुंपणाचा उपटून आणलेला तो गज होता. विकस्टीडमधल्या सुट्टींत जेवायला घरीं जात असतांना वाटेंत त्याला हा प्रसाद मिळाला होता. बिचाऱ्याच्या हाताचें हाड मोडलें होतें आणि कवटीचा पार ठेचा झाला होता.

अदृश्य माणसानें गज आधींपासूनच उपटून आपल्याजवळ तयार ठेवलेला असावा. गज हातांत घेऊनच तो चालत असावा. तरी पण एक मुद्दा जरा आश्चर्य वाटण्यासारखा होता. तो म्हणजे वर सांगितलेले रेतीचे खड्डे विकस्टीडच्या वाटेवर नव्हते. रस्त्यापासून दूर, जवळ जवळ दोनशें यार्डांवर होते. या खुनाबाबत एकच साक्ष मिळाली. हा साक्षीदार म्हणजे एक लहानगी मुलगी होय; आणि तिनेंदेखील खून घडतांना पाहिला नाहींच. आपण जें पाहिलें असें ती म्हणते तें दृश्य असें होतें—विकस्टीड कशाच्या तरी मागें विचित्र पद्धतीनें उड्या मारीत चालला होता. कशाचा तरी तो पाठलाग करीत होता. आपल्या काठीचे तडाखे हाणीत होता. विकस्टीडला मरणापूर्वीं अखेरचें पहाणारी अशी हीच मुलगी. लवकरच तो तिच्या दृष्टीच्या टप्प्याबाहेर गेला. त्यानंतर त्याची नि अदृश्य माणसाची जी झटापट झाली असेल ती—वाटेंत कांहीं झुडपें म्हणा, उंचवटा म्हणा, आल्यामुळें—या मुलीला बघायला मिळाली नाहीं.

यावरून एक तर्क करतां येतो. हा खून निव्वळ माथेफिरू-पणानें किंवा रक्तलालसेनें केलेला नसावा. ग्रिफिननें कदाचित् गज आपल्याबरोबर आधींपासून घेतलेला असेलही; पण तो बळेंच वापरायचा असाच त्याचा उद्देश असेल असें म्हणतां येणार नाहीं.

पण तेवढ्यांत विकस्टीडची त्याची गांठ पडली असावी. विकस्टॉडला हा मग अधांतरीं चाललेला दिसला असेल आणि हें विचित्र दृश्य पाहून तो बुचकळ्यांत पडला असेल. कुणास ठाऊक, त्यानें अदृश्य माणसाबद्दल कदाचित् ऐकलेलेंही नसेल. पोर्ट बरडॉकपासून ही जागा दहा मैलांवर आहे. साहजिकच जिज्ञासेनें त्यानें गजाचा पाठलाग केला असेल. वाटेंत त्यानें काठीचे तडाखे गजावर हाणले असतील. अदृश्य माणूस किती चिडखोर स्वभावाचा होता तें आपण पाहिलेंच आहे. त्यांतून आतां तर त्याला आधींच मनस्ताप झालेला होता. बिचाऱ्या विकस्टीडचे चाळे पाहून त्याचें माथें भडकतें नसलें तरच नवल ! पहिल्यानें त्याला टाळून बाजूला जाण्याचा अदृश्य माणसानें प्रयत्न केला असावा. पण तिकडेही हा आपली पाठ सोडीत नाहीं असें पाहिल्यावर त्यानें अखेरचा उपाय योजला असावा.

पण हा साराच तर्क आहे. प्रत्यक्ष दिसलेल्या गोष्टी—कारण मुलांच्या बोलण्यावर किती विश्वास ठेवावा हाही प्रश्नच आहे—म्हणजे विकस्टीडचें चेंदामेंदा झालेलें प्रेत आणि जवळच्या कांटेरी झुडपांत सांपडलेला तो लोखंडी गज एवढ्याच होत. ग्रिफिननें गज टाकून दिला यावरून या प्रकारामुळें तोही बावरला असावा. तो अतिशय घमेंडखोर, भावनाशून्य माणूस होता हें जरी खरें असलें, तरी आपल्या हत्याकांडांतल्या पहिल्या घोरकर्मानेंच त्याला भोंवळ आली असावी—कदाचित्, कदाचित् त्याला पश्चात्तापही झाला असावा.

तें कांहीं असो. एवढें खरें, कीं हें हिडीस काम उरकून तो पुढें माळरानावरून वेड्यासारखा धावत सुटला. सूर्यास्ताच्या सुमाराला पलीकडच्या शेतांत एका जोडप्यानें त्याचा आवाज

ऐकला. तो मधूनच रडत होता, मधूनच हसत होता; मध्येंच हुंदके देत होता तर मध्येंच किंचाळत होता. त्याच्या किंकाळ्या तर अशा आर्त, कर्कश होत्या कीं शेजारच्या शेतांतून थेट पलीकडल्या बांधा-पर्यंत त्या ऐकूं गेल्या. क्षितिजावर टेकड्यांची रांग दिसत होती तिथें कुठें तरी त्या किंकाळ्या विरल्या—जशा कांहीं समुद्राच्या लाटाच.

दरम्यान केंपला आपण जी माहिती ऐकवली तिचा त्यानें कसा भरपूर दुरुपयोग करून घेतला तें अदृश्य माणसाला समजलें असावें. भिंतीवरचीं पत्रकें तर त्यानें वाचलींच असणार; शिवाय बंद खिडक्या, बंद दारें, बंद स्टेशनें, बंद आगगाड्या त्याच्या स्वागताला सज्ज होत्याच. काळोख पडायच्या सुमाराला माळराना-वरूनसुद्धा लोकांचीं टोळकीं दिसूं लागलीं, कुत्रे भुंकतांना ऐकूं आले. कुत्र्याचा आवाज ऐकला कीं ग्रिफिनच्या अंगावर कांटा उभा राही! या सर्व शिकाऱ्यांना कर्नल ॲडी व केंप यांनीं शेंकडों सूचना दिलेल्या होत्या. अदृश्य माणसाची भेट झालीच तर काय करायचें, एकमेकाला कशा प्रकारें मदत करायची हें सर्व त्यांना सांगितलेलें होतें. पण अदृश्य माणसानें त्यांना टाळलें, आणि यावरून तो किती गलितधैर्य बनला होता तें दिसून येतें. चोवीस तासपर्यंत—तो विकस्टीडचा खून सोडला तर—त्यानें आपण होऊन कोणतीही हालचाल केली नाहीं. रात्रीं त्यानें कुठें तरी कांहीं तरी खाल्लें असावें आणि झोपही व्यवस्थित घेतली असावी. कारण तो सकाळीं उठला तेव्हां त्याच्या अंगांत नवा उत्साह संचारला होता. पूर्ववत् शक्ति, बुद्धिमत्ता नि चापल्य त्याच्यांत आलें होतें. त्याचा क्रोधागार रसरसून फुलला होता. जगाविरुद्ध नि मानवतेविरुद्ध अखेरचा लढा देण्यासाठीं त्यानें दंड थोपटले होते.

* * *

केंपनें तें भयसूचक पत्र दोन वेळां वाचलें. मेणचट कागदावर पेन्सिलीनें खरडलेलें तें पत्र दुपारीं एकच्या डाकेनें आलें होतें.

"तूं बरीच चलाखी दाखवलीस! पण यांत तुला मिळालें काय हें मात्र मला अजून समजत नाहीं. तूं माझ्याविरुद्ध गेलास-सबंध दिवस माझा तूं पाठलाग केलास. मला रात्रीची झोपसुद्धा तूं घेऊं दिली नाहींस! पण लक्षांत ठेव—तुला न जुमानतां मीं अन्न मिळवलं. तुला न जुमानतां मी झोपलों. आपल्या द्वंद्वाची ही नुसती सुरवात आहे. भीतीचं साम्राज्य पसरवणं हाच माझ्यापुढें आतां मार्ग आहे. मी जाहीर करतों कीं भीतीचं साम्राज्य आजपासून सुरू झालं. पोर्ट बरडॉक आतां राणी व्हिक्टोरियाच्या अमलाखालीं नाहीं, मी अदृश्य माणूस राजा आहें. माझ्या राजवटीची सुरवात कशी होणार, माहीत आहे? पहिल्याच दिवशीं मी एकाला देहान्त शासन देणार आहें. नमुना म्हणून—मासला म्हणून—वानगी म्हणून! केंप नांवाचा माणूस ही शिक्षा भोगील. आज मध्यान्हीच्या डाकेबरोबर त्याची मृत्युयात्रा सुरू झाली. त्याला म्हणावं—लपून बस, पहाऱ्यांत बस, तटबंदी कर किंवा वाटेल तीं शस्त्रं घे, अस्त्रं घे; तुझा मृत्यु तुला चुकत नाहीं..... लोक हो, ऐका! ऐका! कृतान्त काळ केंपवर झडप घालायला येत आहे, अदृश्यरूपानें येत आहे. केंपला थारा देऊं नका, केंपला साहाय्य करूं नका! केलंत तर त्याच्याचसारखी तुमचीही गत



होईल....डॉ. केंप आज मरणार!"

केंपनें सुकलेल्या ओठांवरून जीभ फिरवली. 'ही मस्करी मुळींच नाहीं' तो आपल्याशीं म्हणाला. 'त्याचा आवाज आहे हा. आणि तो जें म्हणतो आहे तें उगाच नाहीं.'

त्यानें पत्र उलटून पाहिलं. हिन्टोन्डियन पोस्टाचा त्यावर शिक्का होता. पोर्ट बरडॉकपासून दहा मैलांवर होतें हें गांव. पत्र नॉट-पेड होतें. दोन पेन्स भुर्दंड देऊन केंपनें तें घेतलें होतें.

केंपनें आपलें जेवण अर्ध्यावर सोडलें. तो उठला आणि आपल्या अभ्यासाच्या खोलींत गेला. त्यानें घंटी वाजवून मोलकरणीला बोलावलें आणि 'सगळीं खिडक्या-दारें पक्कीं लावलेलीं आहेत कीं नाहीं तें पहा' म्हणून बजावलें. टेबलाच्या खणांतून त्यानें एक पिस्तूल काढलें आणि कोटाच्या खिशांत सोडून दिलें त्यानें कांहीं चिठ्ठया खरडल्या आणि त्या मोलकरणीला देऊन वेगवेगळ्या पत्त्यांवर जाऊन त्या पोचवायला तिला सांगितलें. त्यांतली एक चिठ्ठी कर्नल ॲडीला लिहिलेली होती. घरांतून कसें बाहेर पडायचें, कुठून कसें जायचें वगैरे तपशीलवार सूचना त्यानें तिला दिल्या.

"तसा कांहीं धोका नाहीं" तो तिला म्हणाला. "—निदान तुला तरी."

मग तो आपल्या निवत चाललेल्या जेवणाकडे वळला. पण जेवणावरून त्याचें लक्ष केव्हांच उडालें होतें. मध्येंच मेजावर बुक्की मारून तो मोठ्यानें उद्गारला, "कुठें पळून जाशील पहातों! तुला पकडून दिलं नाहीं तर माझं नांव दुसरं!"

तो उठला, खिडकीपाशीं गेला. बाहेर खूप ऊन पडलें होतें. हवेंत उकाडा भासत होता.

केंप म्हणाला, "हें उपयोगाचं नाहीं. गारठा पडूं दे. पाऊस पडूं दे. थंडगार वाऱ्याचे झोत वाहूं देत....काल तो कुठें बरं झोपला असेल ? कुठें का झोपेना ! त्याला झोप मिळाली तर त्यांत मला वाईट वाटण्याचं कांहींच कारण नाहीं. आतां कुठें असेल तो ? माझ्या जवळपास तर नाहीं ? माझ्यावर नजर तर नाहीं त्याची ?...."

केंप खिडकीच्या अगदीं जवळ गेला. खिडकीवर 'ठक्' असें कांहीं तरी वाजलें. तो दचकून मागें सरला.

'काय भ्यालों मी !' तो उद्गारला. 'खरं म्हणजे चिमणी किंवा पारवा असेल....'

पण पुन्हा पांच मिनिटें कांहीं तो खिडकीजवळ गेला नाहीं. आणि मग जातो तोंच खालून पुढच्या दरवाजावरची घंटी वाजलेली त्याला ऐकूं आली.

केंप घाईघाईनें खालीं गेला. त्यानें दरवाजाचा अडसर काढला, कुलूप उघडलें. दोन्ही दारांना मिळून सांखळी अडकवलेली आहे एवढें पाहिलें आणि मग अगदीं जपून दार ओढलें. तो स्वतः बाजूला सरकून उभा राहिला.

बाहेरून जेव्हां कर्नल ॲडीचा आवाज ऐकूं आला तेव्हां त्याच्या जिवांत जीव आला. त्यानें सांखळी काढली, दरवाजा जेमतेम उघडला आणि ॲडीला आंत घेऊन परत लावून टाकला.

कोतवालसाहेब धापा टाकीत म्हणाले, "त्या बाईबरोबर चिठ्ठी कशाला धाडलीस ? रस्त्यांतच तिच्या हातांतली चिठ्ठी **त्यानें** ओढून घेतली. ती भयंकर घाबरली. ओरडायला लागली. वेड्यासारखं बरळायला लागली. तिला आतां ठाण्यावर नेलं आहे !"

केंपनें एक त्रस्त उद्गार काढला.

" माझं चुकलंच ! गाढवासारखं मीं तिला पाठवायला नको होतं. हिन्टोन्डियनहून इथें यायला कितीसा वेळ लागतो ? "

" पण काय—झालं काय ? चिठ्ठ्या कशासाठीं ? "

" याच्यासाठीं—" असें म्हणून केंपनें अदृश्य माणसाचें पत्र त्याच्या हातांत दिलें.

ॲडीनें तें वाचलें. केंप म्हणाला, " आणि त्याला फसवून पकडण्यासाठीं मीं एक वेडगळ योजना आंखली अन् मोलकरणी-बरोबर या चिठ्ठ्या धाडल्या !....महामूर्खपणा केला मीं ! "

ॲडी म्हणाला, " केंप, मला वाटतं आपल्याला तो सांपडायचा नाहीं. "

केंप दांतओठ चावून म्हणाला, "त्याचा बाप सांपडेल ! "

इतक्यांत वरच्या मजल्यावरून कांचा फुटल्याचा आवाज आला. केंपच्या खिशांतून सटकन् पिस्तूल बाहेर आलें.

" माडीवर ! " तो म्हणाला आणि धावत सुटला. त्याच्या मागोमाग कर्नल ॲडीही निघाला. ते जिना चढत असतांनाच पुन्हा एकदा कांचा फुटल्याचा आवाज आला. ते अभ्यासिकेंत पोचले तेव्हां खोलीच्या दोन खिडक्या फुटलेल्या त्यांना आढळल्या. हें काम करणारी लठ्ठ गारगोटी टेबलावर पडली होती. हे दोघे चकित होऊन दरवाजांत क्षणभरच उभे राहिले असतील. आणखी एक दगड आला आणि त्यानें खळकन् तिसऱ्या खिडकीची कांच फोडली.

ॲडी म्हणाला, " हें आहे काय ? "

केंप म्हणाला, " ही सुरवात आहे. "

" वर चढाबिढायला जागा नाहीं ना ? "

" मांजरसुद्धा चढूं शकणार नाहीं. "

खळ्ळ....खण्! आणखी एक खिडकी फुटली. पलीकडच्या खोलीची—झोपण्याच्या खोलीची.

केंप खालचा ओठ दातांनीं दाबून म्हणाला, "हें कांहीं त्यानें मोठंसं चांगलं केलं नाहीं. कारण त्या खोलींतल्या सर्व खिडक्यांचे शटर आंतून लावलेले आहेत. कांचा फुटल्या तर बाहेर पडतील अन् त्याच्याच पायांत बोचतील."

आणखी एका खिडकीचा खडखडाट ऐकूं आला.

केंप आणि अॅडी यांनीं एकमेकांकडे पाहिलें. मग ते जिन्याकडे धावले. अॅडी म्हणाला, "मला एक कल्पना सुचली आहे. मी चौकीवर जातों—हातांत एक काठी घेऊन आणि कुत्र्यांची जोडी आणतों!"

तेवढ्यांत आणखी एका खिडकीचे बारा वाजले.

अॅडी म्हणाला, "तुमच्याजवळ पिस्तूल आहे?"

केंप म्हणाला, "नाहीं—म्हणजे देण्यासारखं नाहीं."

"परत आणीन मी" अॅडीनें सांगितलें. केंप खजील झाला आणि त्यानें पिस्तूल दिलें.

कर्नल अॅडी दरवाजाच्या दिशेनें निघाला, तोंच माडीवरची आणखी एक खिडकी फुटली!

केंपनें अगदीं आवाज न करतां दाराची कडी काढली. त्याचा हात किंचित् कांपत होता आणि चेहरा पांढरा फटक पडला होता.

"सरळ बाहेर पडा हं—" तो अॅडीच्या कानाशीं पुटपुटला.

अॅडीनें दार उघडलें. तो बाहेर पडला मात्र, केंपनें पुन्हा दरवाजा लावून घेतला आणि कडी घातली.

अॅडी कांहीं वेळ बंद दरवाजाला पाठ टेकून पायरीवर उभा

होता. मग तो खालीं उतरला आणि ताठ मान करून झपाट्यानें फाटकाकडे निघाला.

आंगणांतल्या हिरवळीवर कांहीं तरी खसबस झाली.

"तिथेंच थांब!" कुणी तरी हुकमी सुरांत बोललें.

अॅडी खाडदिशीं थांबला. खिशांतल्या पिस्तुलावरचा त्याचा हात आणखी गच्च आवळला गेला. पण कर्नल अॅडी मुकाट्यानें थांबला.

"हें ठीक झालं. आतां फीर मागें, आणि घराकडे परत जा!"

"घ-घराकडे?" अॅडी घोगऱ्या आवाजांत म्हणतो. "काय म्हणून?"

"मी सांगतों म्हणून!"

—आवाज डाव्या बाजूनें येत होता. दैवावर हवाला टाकून झाडूं या का गोळी?

"खबरदार!"

अॅडीच्या गळ्यावर अदृश्य हाताची गच्च पकड बसली.

अॅडीच्या पाठींत अदृश्य ढोपरानें ढुशी दिली. अॅडीनें वेडेंवाकडें पिस्तूल झाडलें. दुसऱ्याच क्षणीं धाडदिशीं त्याच्या जबड्यावर ठोसा बसला. मुठींतलें पिस्तूल अदृश्य माणसानें हिसकावून घेतलें.

अॅडीनें शिवी हासडली. आवाज खदखदून हसला.

"ऊठ!"

अॅडी धडपडत उठला.

"चल घराकडे—**चल**!"

"प-प-पण तो मला घरांत घेणार नाहीं...."

"कोण घरांत घेणार नाहीं? तो बेइमान, हरामखोर?....कसा घरांत घेत नाहीं तें पहातों—चल!"

* * *

## २० ‘शंका राहिली नाहीं !’

कर्नल ॲडी घराबाहेर पडल्यानंतर केंप तसाच तातडीनें माडीवर धावला होता आणि आंगणांत चाललेला विचित्र प्रकार त्यानें---खिडकींतून अगदीं जपून डोकें वर काढीन—पाहिला होता. तो प्रकार पाहून त्याला आश्चर्य वाटलें होतें.

“हा गोळी कां झाडीत नाहीं ?” केंप स्वतःशींच पुटपुटला.

इतक्यांत पिस्तूल थोडेंसें हललें. त्यावर उन्हाचा कवडसा पडून केंपचे डोळे क्षणमात्र दिपले. मग एकाएकीं खरा प्रकार त्याच्या लक्षांत आला. पिस्तूल ॲडीजवळ नसून शत्रूच्या हातांत पडलें आहे हें त्यानें ओळखलें आणि तो पटदिशीं मान मागें घेणार इतक्यांत बाहेर विद्युद्‌गतीनें झटापट झाली.

कर्नल ॲडीनें अचानक मागें वळून बेडकासारखी उडी मारली. पिस्तूल पकडण्याचा प्रयत्न केला, तो फसला. पिस्तुलांतून तत्क्षणीं गोळी उडाली. ॲडीनें दोन्ही हात वर केले आणि धाडदिशीं जमिनीवर लोळण घेतली.

पुन्हा कांहीं त्यानें हालचाल केली नाहीं. वटारलेल्या डोळ्यांनीं किती तरी वेळ केंप तें दृश्य पहात होता. दुपारचें कडक ऊन पडलें होतें आणि मधून मधून किंचित् गरम वाऱ्याची झळ येत होती. आसपास सगळीकडे सामसूम होती. शेजारपाजारचीं सर्व खिडक्या-दारें बंद होतीं. चिटपांखरूंदेखील कुठें दिसत नव्हतें. नाहीं म्हणायला केंपच्या घराशेजारच्या दुमजली बंगलीचीच एक खिडकी उघडी होती आणि आंत पलंगावर पडून एक म्हातारा स्वस्थपणीं झोप घेत होता.

कॅंपला एकाएकीं आयुष्य प्यार वाटूं लागलें. मरणाची भीति त्याला पहिल्यानेंच ग्रासूं लागली. भिंतीला चिकटून कॅंप स्तब्ध उभा राहिला.

पुढच्या दरवाजावरची घंटी खणखणली, आणि त्याचबरोबर धडाधड कोणीं तरी दारावर धक्के दिले. कॅंपचें चित्त ताळ्यावर आलें. अगदीं सावधगिरीनें तो जिन्याच्या पायऱ्या उतरून खालीं गेला आणि कान देऊन ऐकूं लागला. सर्व गडीमाणसांना ताकीद दिलेली होतीच. त्याप्रमाणें बाहेरच्या धडधडाटाकडे कुणींही लक्ष दिलें नाहीं; किंवा दार उघडायलाही कुणी धावलें नाहीं.

दूर मैदानावरून तीन व्यक्ति आपल्या घराच्या दिशेनें येत आहेत असें कॅंपला दिसलें. दरवाजावरची धडधड आणखी थोडा वेळ चालली. मग बंद झाली. त्या तीन व्यक्ति मुंगीच्या पाव-लांनीं येत आहेत असें कॅंपला वाटलें. मात्र त्यांतली एक आपली मोलकरीण असून दुसरे दोघे जाडजूड पोलीस शिपाई आहेत एवढें लक्षांत आल्यावर त्याला बरें वाटलें.

दोनतीन मिनिटांनीं मागच्या दारीं सैंपाकघराच्या दिशेनें मोठा धडधडाट ऐकूं आला. लाकडें फोडतांना कुऱ्हाडीचे घाव पडावेत तसें दोन-तीनदा झालें.

कॅंप सैंपाकघराकडे धावला. क्षणभरच तो दाराशीं घुटमळला असेल. मग त्यानें दारांत अडकवलेली किल्ली फिरवली आणि झपाट्यानें दार उघडलें. तत्क्षणीं खिडकीच्या चौकटीचा विध्वंस करणाऱ्या त्या कुऱ्हाडीनें जमिनीवर लोळण घेतली. आणि इतका वेळ जमिनीवर लोळत असलेलें पिस्तूल सपदिशीं उठून खिडकी-पाशीं आलें. 'ठो' आवाज होऊन त्यांतून एक गोळी सुटली; आणि

केंपच्या डोक्याच्या वर फारच थोडें अंतर सोडून दारांत घुसली.

केंपनें खाडकन् दार ओढून घेतलें आणि तो पुन्हा बाहेर झाला.

अदृश्य माणसाच्या खदखदा हसण्यानें सैंपाकघर घुमूं लागलें.

घामाघूम झालेला केंप पुढें काय करावें म्हणून विचार करतो आहे तोंच बाहेरच्या दरवाजाची घंटी पुन्हा वाजली. पोलीस कुमक आली असें खात्रीपूर्वक वाटून केंपचा जीव भांड्यांत पडला. त्यानें धावत जाऊन दरवाजा उघडला, मघां दिसलेल्या त्या तीन व्यक्तींना आंत घेतलें आणि सपाट्यासरशीं दरवाजा पुन्हा लावून टाकला.

"पिस्तूल आहे त्याच्याजवळ...." तो घाईघाईनें म्हणाला, "आणि कुऱ्हाड आहे! तिकडे सैंपाकघराकडे चला...."

केंपच्या मागोमाग सर्वजण आंत निघाले.

तेवढ्यांत अदृश्य माणसानें सैंपाकघराच्या दरवाज्यावर धक्के मारायला सुरवात केली होती. थोड्याच वेळांत दार कोलमडून पडलें. केंपनें धावत जाऊन तीन लोखंडी सळ्या आणल्या. दोन शिपायांजवळ दिल्या आणि एक स्वतःजवळ ठेवली.



सळई हातांत आल्याबरोबर एका हवालदारानें ती दांडपट्ट्याप्रमाणें हवेंत फिरवली. पण कुऱ्हाडीचा प्रहार तिच्यावर बसतांच बिचाऱ्याच्या हाताला झिणझिण्या आल्या

आणि सळई हातांतून निसटली. कुऱ्हाड मागें झाली आणि पिस्तूल ताठ झालें. सटदिशीं एक गोळी सुटली आणि भितीवरच्या एका तसबिरीचा तिनें विध्वंस केला. दुसऱ्या हवालदारानें सळईचा तडाखा मारून पिस्तूल खालीं पाडलें. पण त्यांत आतां एकही गोळी उरलेला नव्हती.

कुऱ्हाड मागें सरून हवेंत लोंबूं लागली. अदृश्य माणसाचा श्वासोच्छ्वास त्यांना स्पष्ट ऐकूं येत होता.

"मागें व्हा—तुम्ही दोघेही मागें व्हा!" त्यानें फर्मावलें. "मला केंप पाहिजे."

"आणि आम्हांला तूं पाहिजेस!" असें म्हणून दोन नंबरच्या शिपायानें पुन्हा एक सळईचा तडाखा हाणला. अदृश्य माणूस त्यामुळें जरा चपापला असावा. पण क्षणभरच.

कुऱ्हाड पुन्हा पुढें झाली, वर चढली आणि इतक्या जोरानें हवालदाराच्या शिरस्त्राणावर आदळली, कीं एखाद्या पुठ्ठयाच्या टोपीप्रमाणें त्याचा चुराडा झाला आणि हवालदारसाहेब मूर्च्छित पडले.

पण एव्हांना पहिल्या शिपायानें आपली सळई उचलली होती. त्यानें अदृश्य माणसाच्या खालच्या अंगाला—पोटरीवरच असावा—जबरदस्त फटका मारला. एक तीव्र किंकाळी फोडून त्यानें कुऱ्हाड जमिनीवर टाकली आणि मग पुढें त्याचें काय झालें कुणास ठाऊक....

हवालदारानें सळई फिरवीत सगळीकडे शोध केला; पण त्याचा पत्ता लागला नाहीं.

दरम्यान केंप कुठें होता?

नंबर एकच्या शिपायानें त्याला हातांत सळई घेऊन जेवण-घरांत शिरतांना पाहिलें होतें.

दोघेही हवालदार जेवणघराकडे धावले. पहातात तों खोलीची मोठी खिडकी सताड उघडी आहे आणि खिडकीच्या कट्टयावर बुटाचे ओरखडे तर उठलेले आहेतच, शिवाय अनवाणी पावलें पण उठलेलीं आहेत.



शेजारच्या घरीं खिडकी उघडी टाकून झोपलेला तो म्हातारा एकंदरींत स्वस्थचित्त प्राणी होता. सबंध गांवानें अदृश्य माणसाचा धाक घेतला, तरी त्याचें असें ठाम मत होतें कीं हें सगळें थोतांड आहे. आणि म्हणूनच खिडकी उघडी टाकून दुपारची झोप ताणण्याचा बेडरपणा त्यानें दाखवला होता.

पण केंपच्या घराच्या खिडक्या फोडून अदृश्य माणसानें जेव्हां धुमाकूळ आरंभला, तेव्हां हे वृद्धकपि खडबडून जागे झाले. त्यानंतर फारच झपाट्यानें ते अधिकाधिक बुचकळ्यांत पडले म्हणा, किंवा 'सारा प्रकार' त्यांच्या लक्षांत आला म्हणा, त्यांनीं आपल्या बंगलीचीं खिडक्यादारें खाडखाड लावून घेतलीं. आणि बंद खिडकीच्या कांचेंतून ते या नाटकाचा पुढचा भाग लक्षपूर्वक पहात बसले.

थोड्या वेळानें घामानें चिंब भिजलेला केंप हरणासारख्या उड्या मारीत याच गृहस्थाच्या आवारांत शिरला आणि त्याची बाग तुडवीत बंगल्याच्या भिंतीपर्यंत पोचला. म्हातारा खिडकीपासून दूर सरतो तोंच केंपनें खिडकीच्या तावदानाला तोंड लावलें आणि दोन्ही हातांनीं खिडकीवर धपाधप धपके मारीत तो कांहीं तरी

ओरडायला लागला. त्याचें बोलणें जरी ऐकूं येत नव्हतें तरी त्याची मुद्रा इतकी पांढरी नि भेदरलेली दिसत होती कीं म्हाताऱ्याला त्याचा आशय तेव्हांच समजला.

"जा इथून! मी तुला आंत घेणार नाहीं! जा म्हणतों ना! जा!" म्हातारा ओरडला.

भयभीत, निराश होऊन केंपनें तो नाद सोडला आणि बागतलीं फुलझाडें पुन्हा एकदा तुडवीत तो पुढच्या फाटकाकडे धावला. बागेचा सत्यानाश केल्याबद्दल त्याच्यावर चडफडत म्हातारा पुन्हा खिडकीशीं येतो तों बागेंतलीं रोपटीं परत एकदा चेपलीं जात आहेत असें त्याला दिसलें.

"बाप रे!" तो घाबऱ्या घाबऱ्या उद्गारला, "आतां मुळीं शंकाच राहिली नाहीं."

* * *

## २१ केंप विरुद्ध अदृश्य माणूस

उघड्या माळरानांतून केंप धावत होता. त्याला वाटत होतें, हा पायाखालचा रस्ता सरणार तरी कधीं? किती लांबची वाट काढली आपण! आणि ही माळजमीन किती ओसाड आहे! इथें आसरा तरी कुठें मिळणार आपल्याला? लपून तरी बसायचं कुठें आपण? या छोट्या टेकड्या ओलांडल्या कीं पलीकडे तें गांव आहे, पण तिथें पोचणार कधीं आपण? दरम्यान—

दरम्यान कृतान्त काळ अदृश्य पावलांनीं आपल्या मागें लागला

आहे. तो आपल्याला केव्हां गांठील याचा नेम नाहीं....

वाटेंत कुठेंही ओबडधोबड खडकाळ जमीन आढळली, अणकुचीदार दगड किंवा कांचेचे तुकडे पडलेले दिसले कीं केंप मुद्दामच त्यांच्यावर बुटाचा पाय देऊन पलीकडे जायचा. आशा ही कीं अदृश्य माणसानेंही अनवाणी पायांनीं तसेंच करावें. पण शहर गांठीपर्यंत तरी अदृश्य माणसाच्या पायाला कांहीं इजा झालेली नव्हती.

शहरांच्या वेशीवर पोचतांच केंपनें "अदृश्य माणूस....अदृश्य माणूस!" म्हणून बोंबाबोंब सुरू केली.

तिथून जवळच ट्रॅमचे रूळ होते. ट्रॅममधल्या उतारूंनीं केंपचा आरडाओरडा ऐकला, रस्त्यावरच्या लोकांनींही ऐकला. आणि जिकडे तिकडे एकच गोंगाट सुरू झाला. ट्रॅममधले उतारू तर उतरून पळायला लागलेच, पण ड्रायव्हरनेंदेखील घोड्यांचा लगाम सोडून देऊन खालीं उडी घेतली आणि तो पळत सुटला.

केंप तसाच सपाट्यानें एका गल्लींत घुसणार तों पाठीमागून त्याच्या कानाखालीं एक रट्टा बसला.

"अदृश्य माणूस! अदृश्य माणूस!" तो ओरडत सुटला. "इथें....जवळ आलाय्....जवळ आलाय्....धावा—धावा!"

हें बोलत असतांनाच चपळाईनें उलटें फिरून त्यानें जोराजोरांत हातवारे केले. पुन्हा एक रट्टा त्याच्या जबड्यावर बसला आणि त्यानें जमिनीवर लोटांगण घेतलें. क्षणार्धांत त्याच्या छातीवर स्वार होऊन अदृश्य माणसानें त्याला ढोपरानें दाबायला सुरवात केली. दोन अदृश्य आसुसलेले हात येऊन त्याचें नरडें दाबूं लागले. केंपला वाटलें—आपल्या थोबाडावर टपोरे घर्मबिंदु उभे

राहात आहेत. आपले गोटीसारखे गोल डोळे बाहेर कुदायचा प्रयत्न करीत आहेत.

पण—पण आपला गळा दाबणार हे हात—त्यांतला एक हात कमजोर आहे का? नक्कीच. म्हणजे अदृश्य माणसाचें एक मनगट दुखावलेलें असावें.

केंपनें एकदम हात वर काढून आपल्या शत्रूचीं दोन्ही मनगटें पकडलीं. अदृश्य माणसाच्या तोंडांतून अस्फुट आर्त स्वर निघाला—"ऊं...."



इतक्यांत पलीकडे रस्त्याचें काम करीत असलेला एक दांडगट दिसणारा कामगार हातांतलें फावडें घेऊन आला आणि त्यानें खूप आवेशानें फावडें उगारून मारलें.

केंपच्या गळ्याभोवतालची पक्कड एकदम ढिली पडली. दोन्ही हातांनीं अंगावरचा बोजा ढकलीत केंप उठला. अदृश्य माणसाचे दोन्ही खांदे पकडून त्यानें त्याला खालीं पाडलें आणि त्याच्या छातीवर बसून तो ओरडत सुटला, "सांपडला....सांपडला! लवकर या! कुणी तरी पाय पकडा त्याचे....लवकर!"

आतांपर्यंत आणखी बरेच लोक तिथें जमले होते. त्यांतले कांहीं त्याच्यावर तुटून पडले. इतकीं माणसें अंगाला झोंबत असतांनासुद्धा अदृश्य माणसानें विलक्षण धडपड केली. त्याची ताकद अचाट

होती आणि धैर्यही जबरें होतें यांत शंका नाहीं. कारण एवढ्या लोकांना मागें रेटून तो पुन्हा एकदा ताठ उभा राहिला. केंपनें मात्र त्याला घट्ट मिठी मारून ठेवली होती ती सोडली नाहीं.

'जॉली क्रिकेटर' खाणावळ इथून फार लांब नव्हती. तिथें यथेच्छ खाना खाऊन आणि मद्य पिऊन ताजेंतवाने बनलेले कांहीं गडी तेवढ्यांत या ठिकाणीं आले आणि तेही हिरिरीनें केंपच्या मदतीला धावले.

अदृश्य माणूस परत भुईसपाट झाला. केंपनें पुन्हा त्याच्या उरावर बसून त्याचे हात दोन्ही बाजूंना घट्ट दाबून धरले. अदृश्य माणसानें थडाथड लाथा झाडल्या. पण दुसरे लोक त्याच्या अंगावर पडले. सर्वांनीं मिळून त्याला वाटेल तसें दाबलें, ठेचलें, लाथाडलें, मारलें!

"आई—आई—अयाई ग !...."

अदृश्य माणूस कण्हत होता, रडत होता. पण तें कण्हणें, रडणें फार वेळ टिकलें नाहीं. त्याचा आवाज घुसमटल्यासारखा येऊं लागला.

"बाजूला व्हा—बाजूला व्हा!—काय करतांहां हें? मूर्ख नाहीं तर!" केंप रुद्ध कंठानें म्हणाला. त्यानें भराभर लोकांना ओढून बाजूला केलें. तो स्वतः मात्र अदृश्य माणसाच्या छाती-वरून उठला नाहीं.

"तो घायाळ झाला आहे. समजत नाहीं तुम्हांला?—दूर सरा आतां."

लोक दूर सरले. डॉ. केंप अधांतरीं स्वार झाल्यासारखा बसला होता आणि उजव्या हाताचीं दोन बोटें त्यानें चिमटी केल्या-सारखीं धरलीं होतीं. तो अजब देखावा पाहून एखाद्याला वाटलें

असतें, एखाद्या पिशाच्चाला बोलवत असलेला हा कुणी मांत्रिक त्रिंत्रिक तर नाहीं ?

गर्दीतून कोणीं तरी सूचना केली, "डॉक्टरसाहेब, त्याला ढिलं सोडूं नका, बरं का ? त्याचं ढोंग असेल हें !"

"ढोंग नाहीं" केंपनें गंभीरपणें उत्तर दिलें. त्याचा स्वर स्पष्ट निघत नव्हता, कारण मघाच्या मारामारींत त्याच्या तोंडाला लागलें होतें आणि ओठ रक्तबंबाळ झाले होते. रक्त चढल्यामुळें त्याचा संबंध चेहेरा लाल भडक दिसत होता.

केंपनें आपला दुसरा हात, अदृश्य माणसाचा चेहेरा ज्या ठिकाणीं असेल तिथून फिरवला.

"तोंड ओलं आहे" तो म्हणाला, "पार ओलं चिंब आहे—" आणि मग "अरे बाप रे !—"

केंप एकदम उठला आणि जरा दूर सरून त्यानें जमिनीवर गुडघे टेकले, हातांनीं त्यानें कांहीं तरी चांचपल्यासारखें केलें. एक हात अदृश्य माणसाच्या तोंडाजवळ मागें-पुढें हलवला.

केंप उठून उभा राहिला आणि उजव्या बाहीनें तोंडावरचें रक्त पुशीत म्हणाला, "छातीचे ठोके ऐकूं येत नाहींत. श्वासोच्छ्वासही बंद पडलेला दिसतो."

त्या जाडजूड कामगाराच्या बगलेखालून एका खुरटलेल्या म्हातारीनें डोकें काढलें होतें. ती एकदम किंचाळली, "अयाई ! तें काय आहे, पाहिलंत ?"

* * *

म्हातारी दाखवत होती त्या दिशेनें सर्वांच्या नजरा वळल्या आणि लगेच कित्येकांच्या तोंडून कांहीं ना कांहीं अस्फुट उद्‌गार बाहेर पडले.

शरीर-विज्ञानाच्या पुस्तकांत विद्यार्थ्यांसाठीं शिरांची नि धमन्यांची मनुष्याकृति काढलेली असते, तसली आकृति जमिनीवर दिसूं लागली होती. हळुहळू पण निश्चित तिला स्पष्ट रूप येऊं लागलें. मात्र या शिरा नि धमन्या पारदर्शक होत्या—जणू कांचेच्या नलिकांचेंच शरीर बनवलें होतें.

आणि मग हळुहळू मज्जा दिसूं लागल्या, स्नायु दिसूं लागले, हाडें दिसूं लागलीं....सगळेच शरीरभाग दृश्यमान झाले.

आणि जसजशी आकृति दृश्य होत चालली, तसतसा तिचा पारदर्शकपणा कमी होत चालला. पहिल्यानें जी धूसर, ढगाळल्यासारखी दिसत होती तीच हळुहळू जास्त उठावदार, स्पष्ट दिसूं लागली.

"ते पहा त्याचे हात दिसताहेत..."

"ते पहा त्याचे पाय!"

आणि मग धीरे धीरे अदृश्य माणूस दृश्यांत येत चालला. पण तेंदेखील किती नाटकी पद्धतीनें झालें? मेल्यावरसुद्धा त्याच्यांतला नाटकीपणा कमी झाला नव्हता!

अगोदर हातापायांपासून सुरवात झाली. आणि मग ही नवदृश्यतेची लाट पसरत पसरत त्याच्या हृदयापर्यंत गेली. विष भिनत जावें तशी दृश्यता भिनत गेली. नाजूक धमन्या-शिरांचें जें उघडें प्रदर्शन इतका वेळ भरलें होतें त्यावर आतां कोणी अदृश्य जादूगार मांसलतेची कनात पसरूं लागला. शेवटीं सर्वांवर

गौर कातडीचें आच्छादन घालून त्यानें आपला खेळ संपवला.

जमलेल्या लोकांना शेवटीं काय दिसलें?

सुमारें तीस एक वर्षांचा पूर्ण नग्न असा तरुण.

मानसिक चिंतेनें चेहेरा ग्रासलेला होता आणि असंख्य व्रणांमुळें शरीराची दुर्दशा उडाली होती, तरी सशक्त नि सुंदर असें त्याचें मूळ रूप असावें. त्याचे केस आणि भुवया पांढऱ्या रंगाच्या होत्या, पण त्या म्हातारपणामुळें नसून अल्ब्युमिनच्या अतिरेकाचा तो परिणाम होता. त्याचे डोळे ताठ उघडे असून माणकासारखे लाल लाल दिसत होते. हातांच्या मुठी वळलेल्या होत्या. चेहेऱ्यावर क्रोध आणि उद्वेग सांडून राहिला होता.

एकजण ओरडलां, "कुणी तरी तोंड झाका त्याचं!"

एकानें जॉली क्रिकेटर्स क्लबांतून एक पांढरी शुभ्र चादर आणली आणि तो अद्वितीय देह पुरता झाकून टाकला. नंतर दोघांनीं उचलून तो क्लबांत नेला. एका अंधाऱ्या खोलींत मोडक्या नि गलिच्छ खाटेवर तो देह निजवला गेला. आणि पोर्ट बरडॉकचे ते भोळेभाबडे अडाणी गांवकरी सभोवतीं उभे राहून त्या अजब देहाकडे विस्मयानें पाहूं लागले.

अशा रीतीनें जगाच्या इतिहासांत अदृश्यतेचा पहिलाच यशस्वी प्रयोग करणारा ग्रिफिन इंग्लंडच्या एका कोपऱ्यांत उगवला, चमकला आणि तिथेंच गांवकऱ्यांच्या लाथा नि धूळ खात लज्जास्पद स्थितींत मेला. वैऱ्यावरसुद्धा जें मरण येऊं नये तें दुनियेंतल्या अशा अत्यंत प्रतिभाशाली नि ज्ञानी पण मायेफिरू माणसाच्या वांट्याला आलें.

* * *